हिंदुधर्म—लोकाधार

श्रीयुत

**लक्ष्मण बलवन्त**

ऊर्फ

**अण्णासाहेब भोपटकर**

यांस

अत्यन्त प्रेमादरपुरःसर

**अर्पण**

# अंजन

## एक .... .... .... 'सहज' घडलेला परिचय!

मोटरनें एकदम हेड लाइट्स्च्या प्रखर प्रकाशाचा झोतच्या झोत सोडला, आणि घर्र्र्र् आवाज करीत ती वेगानें निघून गेली.

बाहेर चतुर्थीच्या चंद्राचे म्लान, परंतु रम्य चांदणें पडलें होतें; त्या अस्पष्ट प्रकाशात अगदीं गालाला गाल लागलेले दोन चेहरे मृदु हास्यानें उज्ज्वल झाले—परंतु ते क्षणमात्रच!

इतक्यांत मागून कुणीं म्हटलें,

"गुड् ईव्हिनिंग! (नमस्कार!)"

बोलणारी व्यक्ति स्त्री होती, हें तिचा कंठस्वरच सांगत होता. चांदणें कांहीं स्वच्छ नव्हतें; परंतु तेवढ्यांतहि, ती स्त्री युरोपियन असावी असें दिसलें.

श्रीकान्तानें विस्मयानें तोंड फिरवून प्रत्यभिवादन केलें,

"गुड् ईव्हिनिंग!"

" आमची गाडी पलीकडे—त्या तिथं उभी होती; ती गेली कुठं, कृपा करून सांगाल मला ? "

श्रीकान्त उद्गारला,

" आपली का होती मोटर ती? ओः! पण ती तर आतांच गेली निघून—"

" निघूनहि गेली ? अं ? म्हणता काय? पण छे छे—कांहीं तरी चूक होते आहे आपली ! मला इथं अशी सोडून गाडी निघून जाईल, हें शक्यच नाहीं मुळीं ! गेली असेल जवळच कुठं तरी—येईल इतक्यात परत पांच-दहा मिनिटांत ! "

" हो, येईलहि परत ! " कांहीं तरी बोलायचें म्हणून श्रीकान्त बोलला.

क्षणभरानें ती तरुणी म्हणाली,

" आपली कांहीं हरकत नसेल, तर गाडी परत येईपर्यंत इथं बसून आपणाशीं थोड्या गप्पाटप्पा मारीन म्हणते. चालेल? वेळ जाईल आपला माझा! एकान्तच आपणाला हवा असं नाहीं ना ? "

" छे छे! असं बिलकुल नाहीं." स्मित करून श्रीकान्त म्हणाला. " आपणाशीं चार गप्पागोष्टी करायला मिळणं हे माझं महत्‌भाग्यच समजतों मी ! या ना—बसा इथं—"

श्रीकान्ताजवळ बांकावर बसतां बसतां तरुणी मधुर स्मित करीत म्हणाली,

" बसतेंच—उगीच भलते शिष्टाचार कशाला अशा वेळीं ! खरं कीं नाहीं, मिस्टर—मिस्टर—"

असें म्हणून ती अपेक्षेनें मध्येंच थांबली, व त्याच्या तोंडाकडे पाहूं लागली.

श्रीकान्त चटकन् म्हणाला,

" मिस्टर मुजुमदार—"

" थँक यू! (आभारी आहे मी आपली!) आपण हिंदु ना ? "

श्रीकान्त हंसून म्हणाला,

" हो—आपण कसं बरं ओळखलं ? माझा पोषाख तर आहे हा साहेबी—"

मृदु हास्य करून तरुणी म्हणाली,

" माझा जन्म या देशांतच झाला, मिस्टर मुज–मुजमुडार ! अन् आतांपर्यंतचीं माझ्या वयाचीं सारीं एकोणीस वर्षे या देशांतच गेलीं बहुतेक. मी तुमच्या या मुंबईतच राहिलेली आहे, म्हणा ना !"

एकोणीस वर्षे ! एकोणीस वर्षांच्या युरोपियन तरुणीशीं संभाषणाचा नसला, तरी निर्जन सहवासाचा प्रसंग श्रीकान्ताच्या आयुष्यांत हा पहिलाच होता. त्याच्या हृदयात 'कसेसे'च होऊ लागून मस्तकांत झिम्झिम् आवाज सुरू झाले.

त्या तरुणीच्या कमनीय देहावरून कसल्या तरी विलायती इसेन्सचा तीव्र गंध वाऱ्याच्या झुळुकीबरोबर दरवळून समग्र वातावरणांत कांहीं विलक्षण मादकता उत्पन्न करीत होता !

समोर सीमाबद्ध सागर देह विस्तारून, अंगावर ज्योत्स्नेचे मऊ झिरझिरीत पांघरूण घेऊन शान्तपणे पहुडला होता. त्याच्या परतन्त्रतेला डिंवचीत मोकळेपणीं वहाणारा वारा हसत हंसत खिदळत होता. आकाशांत राहूनहि पृथ्वीवर किरण-रसाचा वर्षाव करून चंद्र तेथील मादकता सारखी वाढवीत होता !

इतक्यांत बाजूच्या वांकणावरून एक मोटर हळुहळू वळण घेऊन त्या बाजूला येत होती; तिने तितक्यांत आपल्या सर्च–लाइटचा झोत समुद्राच्या बाजूला पाडला. तो प्रकाश चारदोन क्षण किनाऱ्या-वरच्या या बांकावरहि पडून हळुहळू नाहींसा झाला.

तेवढ्या अल्प क्षणांतहि, त्या अस्थिर प्रकाशांत श्रीकान्ताला आढळून आले, कीं आपल्या शेजारीं बसलेली तरुणी चांगलीच सुंदर आहे—तिच्या साऱ्या शरीराला व्यापून रहाणारी यौवनश्री तिनें परिधान केलेल्या 'स्कर्ट'ला बिलकुल न जुमानतां जणूं बाहेर उसळून

निघत आहे! तरुणीने मस्तकावर ठेवून दिलेल्या लहानशा टोपीनेहि तिच्या मुखलावण्यांत चांगलीच भर पडली आहे!

समुद्राकडे दृष्टि लावून तरुणी म्हणाली,

" किती सुदर दिसते आहे शोभा समुद्राची आज! नाहीं? खरंच, चांदणं म्हणजे देवाची माणसाला केवढी तरी सुदर देणगी आहे!"

" खरं आहे आपलं म्हणण! " श्रीकान्त मान डोलवून म्हणाला. " पण खरं सांगायच, तर आजची ही इथली शोभा म्हणजे कांहींच नाहीं! हे चतुर्थीच म्लान चांदण मनांतली खिन्नता वाढवत; नाहीं तर नसती उदासीनता उत्पन्न करत. चांदण्याच खरंखरं सौंदर्य अन् मादकता अनुभवायची असेल, तर पूर्णिमेच्या मध्यरात्रीं इथं यावं! समुद्राच्या साऱ्या विस्तारावर चांदणं सारख नाचत असतं, तेव्हां इथली शोभा पाहूं, का तिथली, का दूरची, अस होऊन जातं पहाणाराला! आपण रोज येतां का या बाजूला, मिसेस—? "

मृदुपणे हास्य करून श्रीकान्ताकडे पहात तरुणी म्हणाली,

" मिसेस बिसेस नाहीं अ—मिस् नुसती! अजून माझं कांहीं लगीन झालेलं नाहीं, मिस्टर मुजमुडार! माझं नांव मिस् फ्लोरेट टेम्पल! ह—काय विचारलंत मला तुम्हीं? रोज येतें का?—नाही–रोज नाही येत –नाहीं येत—तरी पुष्कळ वेळां येते, एवढं खरं! "

'फ्लॉवर' म्हणजे पुष्प; पण 'फ्लॉरेट' म्हणजे काय? लहान फूल—'कुसुमिका' असे नांव दिले तरी चालेल नव्हे या नवयुवतीला?

'फ्लॉरेट' हे नांव ऐकतांच श्रीकान्ताला अमळ कसेसेच झाले होते. या तारुण्यमंडित सुंदर किशोरीला हे इंग्रजी कठोर नाव शोभत नाहीं, अशी त्याची भावना होते न होते तोंच, 'कुसुमिका' हे काव्यगंधि स्वदेशी नांव हिला फार खुलून दिसेल, अशी कल्पना श्रीकान्ताच्या मनांत येऊन त्याच्या मनांतले ते 'कसेसें'च चटकन् नाहींसे झाले.

किंचित् हंसल्यासारखें करून फ्लॉरेटकडे पहात तो म्हणाला,

" वा: ! आपलं नांव भारी, म्हणजे भारीच सुंदर आहे ! अन् आपल्या मुखाकडे पाहिलं म्हणजे, या नांवाची सार्थता चटकन् पटतेहि !"

फ्लोरा हंसली, व म्हणाली,

" खरं का ? अस्सं ! आपलं हें मत ऐकून माझ्या मनाला अतिशय आनंद वाटला. पण आपणाला माझं खरं मत सांगायचं, तर आपण थोडीफार अतिशयोक्ति करीत आहां, असंच म्हणणं भाग आहे मला ! "

श्रीकान्त किंचित् ओशाळल्यासारखा झाला. म्लानपणें हंसून तो म्हणाला,

" अतिशयोक्ति ? हंः—मुळींसुद्धां नाहीं, मिस् टेम्पल ! माझ्या मताशीं ज्याचं मत जमत नसेल, तो अगदीं आंधळा किंवा अरसिक आहे, अस खुशाल समजावं ! "

फ्लोरा खूब मोठ्यानें हंसली, व उद्गारली,

" वा—म्हणजे शाबासच म्हणायची ! "

अशा हास्यपरिहासांत जवळजवळ अर्धा तास गेला; तरी मोटर येण्याचे चिन्हहि दिसेना ! फ्लोरा सारखी इकडे तिकडे पहात होती !

आणखीहि थोडा वेळ गेला; तरी मोटरीचा पत्ता नाहीं !

फ्लोरा आतां अतिशयच चिंतातुर दिसूं लागली. ती चांगली घोटाळ्यांत पडली.

" काय झालं ? असं कां करतां आहां तुम्ही ? " श्रीकान्ता विचारले.

" नाहीं—पण मोटर कशी आली नाहीं अजून, म्हणतें मी ? "

श्रीकान्त हंसून म्हणाला,

" आली नाहीं, अन् येण्याचा संभवहि नाहीं, मिस् टेम्पल ! "

त्याच्याकडे पहात आश्चर्यानें फ्लोरा उद्गारली,

" म्हणजे काय ? कां नाहीं यायची मोटर ? "

" तें असं, मिस् टेम्पल !" श्रीकान्त हंसून म्हणाला. "त्या मोटार-मध्यें एक तरुण अन् एक तरुणी होती, नव्हे ?"

" म्हणजे, आपण त्यांना पाहिलं का ? हो, माझी एक प्रिय मैत्रीण अन् तिचा नवरा होता त्या मोटरींत. त्यांचं लगीन होऊन दोनएक महिने झाले असतील !"

श्रीकान्त आतां खूब मोठ्यानें हंसला, व म्हणाला,

" झालं तर ! आपल्याच तोंडानं न्याय झाला, मिस् टेम्पल ! नवीन लग्न झालेल्या दाम्पत्यानं आपणासारख्या तिसऱ्या माणसाला विसरून जावं, यांत फारसं नवल नाहीं ! आपणाला एक लहानशी सूचना करून ठेवूं का ?"

" बोला ना—"

" यापुढं नवदाम्पत्याबरोबर कुठही फिरायला जायच्या अगोदर तुम्ही मनाशी खूब खूब विचार करीत चला !" असें म्हणून श्रीकान्त खूब मोठ्यानें हसला.

फ्लोराहि हंसली, व म्हणाली,

" खरं आहे ते ! आपली ही धोक्याची सूचना अतःपर मी नेहमीं ध्यानांत ठेवीन—"

क्षणभर दोघेही स्तब्ध होतीं. नंतर संकटापन्न व्यक्तीप्रमाणें फ्लोरा अत्यंत व्यग्रतेने म्हणाली,

" पण आतां मी करू तरी काय बाई ?"

श्रीकान्त चारदोन क्षण विचारांत पडल्यासारखा दिसला. नंतर तो म्हणाला,

" आपणाला पोचविण्याचा भार जर आपण मजवर टाकाल, तर मला अतिशय आनंद होईल, मिस टेम्पल ! अर्थात् आपली अनुमति असेल तर—"

चटकन् श्रीकान्ताच्या खांद्याला कोमल करस्पर्श करून फ्लोरा म्हणाली,

" खरंच—मला पोंचवाल तुम्ही? खरंच?—सो व्हेरी काइंड ऑफ यू—सो गुड ऑफ यू! (किती ममताळू अन् चांगले आहां तुम्ही!)"

फ्लोराच्या स्पर्शानें श्रीकान्ताच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. कंपित स्वरानें तो म्हणाला,

" नाहीं—तसं कांहीं नाहीं. चला, या—"

बसल्या बांकावरून उठून तीं उभयतां जरा अंतरावर येऊन एका टॅक्सींत बसलीं.

" कुलाबा—"

फ्लोरानें ड्रायव्हरला हुकूम केला.

## दोन .... .... .... .... .... राष्ट्रद्रोहाचें निरसन

त्या दिवशीं घरीं यावयाला श्रीकान्ताला बरीच रात्र झाली.

श्रीकान्तानें फ्लोराला तिच्या बिन्हाडीं पोंचविलें, आणि—वरकरणीं कां होईना—ती लगेच घरीं जावयाला निघाला. परंतु ती का तशी आपल्या या नवपरिचित मित्राला इतक्या घाईनें जाऊं देते ? तिनें अर्थात्‌च त्याला बसवून घेतलें, आणि श्रीकान्ताच्याही हवें तेंच नशिबीं आलें !

फ्लोराही चांगली अघळपघळ बोलणारी दिसली. दोघांची खूब गप्पाष्टकें झालीं. फ्लोराने मित्राला चहा-केक दिल्यावांचूनहि सोडलें नाहीं !

शेवटीं, नाइलाजानें, श्रीकान्त घरीं जावयाला उठला.

त्या वेळीं, त्याच्याकडे कोमल दृष्टीनें पहात लडिवाळपणें फ्लोरा म्हणाली,

" जातां ! बरं. उशीर झाला खराच ! पण उद्यां यायचं हं—अगदीं न चुकतां ! सहा वाजतां संध्याकाळीं अगदीं वाटेकडे डोळे लावून राहीन हं मी ! कबूल ? "

श्रीकान्ताच्या हृदयांत या एकंदर प्रकारामुळें मोठ्या आनंदोर्मि उसळत होत्या ! स्मितपूर्वक तो एकदम म्हणाला,

" एकदम कबूल !—"

" बघा अं—विसराल ! उद्यां संध्याकाळीं दोघंजणं आपण फिरायला जाऊं—"

" वाः ! फारच छान ! "

आपला छोटा रुमाल लडिवाळपणें श्रीकान्ताच्या खिशांत ठेवून फ्लोरा म्हणाली,

" माझा हा रुमाल आठवणीसाठीं ठेवून देतें मी तुमच्या खिशांत ! हो, नाहीं तर पुरुषांची जात !—विसरभोळी ! मग काय, ठरलं तर,

मिस्टर मुजमुडार ! उद्यां संध्याकाळीं सहा वाजतां इथं येऊन हा रुमाल तुम्हीं मला परत द्यायचा—चुकायभुलायचं नाहीं !"

"वा !—असली गोड आठवण मी कसा विसरेन?" श्रीकान्त हंसत हंसत म्हणाला.

फ्लोराहि मृदु स्मित करून म्हणाली,

"त्याबद्दल माझीदिखील खात्री आहे ! यू आर अ डियर गुड बॉय ! (खरंच, तुम्ही किती प्रेमळ अन् छान छान आहां !) बरं, या तर अं—गुड् नाइट !"

"गुड् नाइट !"

"उद्यांचं?—ऑनर ब्राइट? (अगदीं प्रामाणिकपणं?)"

"ऑनर ब्राइट !"

घरीं परत येतांना, आपण जणूं सुखसागरांत पोहत आहों, असेंच श्रीकान्ताला वाटत होतें ! मात्र त्याचे हें सुख निर्भेळ नव्हते ! कसला तरी दोष, कांहीं तरी उणीव त्यांत होती; आणि ती त्याच्या मनाच्या एका कोपऱ्यांत सलतहि होती ! फ्लोरासारख्या गौरांग सुंदर तरुणीच्या सहवासाच्या मधुर आठवणीचा आस्वाद घेत असतांच, श्रीकान्ताच्या मानसनेत्रांसमोर एक मृदु, सात्त्विक, कमनीय मुखमंडल दिसत होते !

आणि ते म्हणजे सुनन्दाचे. सुनन्दा ही श्रीकान्ताची अर्धांगी.

आज घडून आलेली ही विलक्षण, अकल्पनीय घटना नन्दाला आपण कळवावी काय ?

श्रीकान्ताच्या मनाला हा विचार एकसारखा त्रास देत होता !

सुनन्दा ही त्याची विवाहित सहधर्मचारिणी होती, 'आर्य' ललना होती, 'पति हाच पत्नीचा अलंकार' या तत्त्वाला पूर्ण मान देणारी होती, हे सर्व खरे; परतु ती फार अभिमानीही होती ! तिला हा प्रकार बहुधा,—बहुधा कां ?—अगदीं खात्रीनेंच आवडण्यासारखा नव्हता ! त्या बातमीमुळे घरांत आणि संसारात थोडीफार अशान्तता निर्माण होण्याचा फार संभव होता.

विचारान्तीं, नन्दाला ही बातमी कळवावयाची नाहीं, असाच श्रीकान्तानें निश्चय केला. मनाशीं तो म्हणाला,

" काय अडलं आहे एवढं सांगण्यावांचून आपलं तरी ! कळलं, तर स्वारी काय डोक्यांत घेईल न् काय नाहीं, त्याचा काय नेम आहे ! छट्,. जाऊं दे झालं ! "

श्रीकान्त घरीं जातो, तों सुनन्दा त्याची अगदीं वाटच पहात बसली होती. पतीचें पाऊल दारांत पडतें न पडते, तोंच ती एकदम म्हणाली,

" अगबाई ! किती किती झाला उशीर आज ! पोरगी आतांपर्यंत स्वारीसाठीं अगदीं ताटकळत बसली होती. शेवटीं कंटाळून झोंपली-दिखील बिचारी ! खरंच, कां झाला गडे आज उशीर एवढा ? सैंपाक अगदीं निवून गारगोट्या झाला ना ! "

श्रीकान्त आज अगदीं पहिल्यानेंच बायकोजवळ खोटें बोलला ! हंसून तो म्हणाला,

" तें कांहीं विचारूं नकोस, नन्द ! कधींकधीं मोठं विलक्षण होतं ! आज एकाएकीं समुद्रावर माझ्या एका लहानपणच्या शाळासोबत्याची भेट झाली. किती तरी वर्षांनीं भेटला मला तो ! तेव्हां, केव्हां वेळ गेला गप्पाष्टकांत, ते कळलंदिखील नाहीं ! मोठा अधिकारी आहे तो तिकडे कराचीकडे—डेप्युटी कलेक्टर का कायसा ! शेवटीं, अगदीं नाइलाजान तुझ्या रागाची जेव्हां भीति घातली, तेव्हां कुठं झाली आमची सुटका ! "

सुनन्दाच्या मुखमंडलावर मृदु स्मिताची मधुर प्रभा विलसूं लागली. कृत्रिम कोपाने भुंवया आकुंचित करून ती म्हणाली,

" चला जा गडे ! कांहींच्या बाहींच आपलं बोलायचं ! मी रागवणार का ? शाब्बास बाई ! जिथं तिथ आपली अशी माझी निंदा करणं कांहीं बरं नाहीं अ ! सागून ठेवते ! "

पत्नीच्या गालावर नाजुक चापट मारून श्रीकान्त हंसत हंसत म्हणाला,

" वा ग वा ! निंदा का ही ? ही तर बाईसाहेबांची स्तुति आहे स्तुति—अगदीं निर्भेळ प्रशंसा ! "

पतिराजांनीं काढून दिलेला कोट व टोपी हातीं घेऊन सुनन्दा उद्गारली,

" वाः ! इकडच्या कोटाला आज हा भारीच गोड वास येतो आहे बाई ! वाः—छान ! कसला सेन्ट बरं हा ? कुठं यायचं माखून सेन्ट गोड गोड हा असला ? "

कोटाच्या आंतल्या खिशांत फ्लोरानें दिलेला सुगंधित रुमाल होता. त्याचा विशिष्ट सुगंध नन्दाच्या नाकाला झपाटून आपण असे पकडले जाऊं, अशी श्रीकान्ताला अर्थातच कल्पना नव्हती. तोही सेन्ट मधूनमधून वापरीत असे—नाहीं असें नाहीं. परंतु फ्लोराच्या रुमालावर माखलेल्या सेन्टचा सुगंध कांहीं विशिष्ट तऱ्हेचा आणि त्यामुळें सुनन्दाला पूर्ण अपरिचित होता. ती एकदम तसें उद्गारली, याचें कारण तरी हेंच होतें.

पत्नीच्या प्रश्नानें श्रीकान्ताचा चेहरा एकदम उतरला. परंतु तें सुनन्दाच्या लक्षांत येणें शक्य नव्हतें.

एकदोन आंवढे गिळून श्रीकान्त चांचरत म्हणाला,

" हा––हा सेन्ट होय ? हां—माझ्या त्या मित्रानंच तर माखला ना माझ्या रुमालावर हा ! पण राहू द्या ना आतां हें सारं—अगोदर आमच्या पोटाची तजवीज करा कीं ! अशी भूक लागली आहे कडकडून म्हणतां ! जा, वाढा—तोंपर्यंत मी हातपाय धुऊन येतो—"

सुनन्दा अर्थात् ताबडतोब स्वयंपाकघराकडे गेली. तिला पतिराजांविषयीं वांकडी तिकडी कांहीं कल्पनाच नव्हती ! नाहीं तर, समुद्रावर फिरावयाला येतांना, मित्रवर्यांनीं 'इसेन्स'ची बाटली मुद्दाम खिशांत घालून आणली होती कीं काय, असा प्रश्न सहजच तिला पतिराजांना विचारतां आला असता !

सुनन्दानें झटपट पतिराजांचें ताट वाढून तयार केलें, आणि तेहि तावडतोब पाटावर येऊन विराजमान झाले.

जेवणाकडे श्रीकान्ताचें फारसें लक्ष नव्हतें. आज नुकतीच घडलेली विलक्षण घटना त्याच्या मानसनेत्रांसमोर सारखी नाचत होती. फ्लोराचें कमनीय मुखमडल, तिची रम्य आकृति, तिचे मधुर विभ्रम, तिचें मृदु, हास्यमय बोलणेंचालणें, या सर्वांच्या स्मृतीनें त्याच्या मस्तकांत नुसता कल्लोळ उडविला होता !

सुनन्दा कांहीं फारशी सुंदर नव्हती—होती आपली चारचौघींजणीं-सारखीच ! रंगानेंहि ती अमळ काळीसांवळीच होती. परंतु तिचा चेहरा आणि देहावयव चांगले रेखीव आणि ठसठशीत होते. तिचा चेहरा चांगला आकर्षक असला, तरी त्याच्या ठिकाणीं उग्र मादकता नव्हती. पवित्र नंदादीपाचें शान्त, अखंड दीप्तितेज तेथें विलसत होतें. तिच्या मुख-मंडलाकडे पहातांच पहाणाराच्या मनांत प्रेमस्नेहाचा उद्रेक होण्यासारखा असला, तरी तेथे कलुष, तीव्र लालसेचा उद्भव होणें सुतराम् संभवनीय नव्हतें.

परतु आहा ! ती परदेशीय तरुणी ?—

तिचा चेहरा, अगकान्ति, देहयष्टि, हंसणेंबोलणे—सर्वच कांहीं विलक्षण उन्मादक होतें ! फ्लोराच्या पूर्ण विकसित रम्य यौवनपुष्पाचा उग्र गंध कोणाचेंहि मस्तक फिरविण्यासारखाच होता ! तिच्या अंगां-गांतून निथळणाऱ्या लावण्यांत आकर्षणाबरोबरच जबरदस्त उन्मादहि होता. मूर्ख अविचारी पतगांना आपणाकडे जबरदस्तीने आकर्षून घेणाऱ्या दीपज्योतीचें दाहक आणि उन्मादक तेज फ्लोराच्या सौंदर्य-लावण्यांत पूर्णांशानें होतें, एवढेच थोडक्यांत सांगतां येईल.

अशा ‘गुणां’च्या त्या आंग्ल तरुणीच्या नुसत्या कांहीं क्षण लाभलेल्या सहवासानें श्रीकान्तासारख्या तरुणाचे मन पुरे भ्रान्त केलें, तर त्यांत काय नवल आहे ? संभाषणाच्या भरांत ज्या ज्या ठिकाणीं श्रीकान्ताच्या शरीराला फ्लोराचा अगस्पर्श सहज रीतीनें झाला होता, त्या त्या ठिकाणीं

गुलाबाच्या फुलासारखा तो नाजुक आणि सुगंधमय स्पर्श अजूनहि पूर्णपणें आपणाला अनुभवायला मिळत आहे, असा श्रीकान्ताच्या मनाला सारखा भास होत होता !

परंतु कांहीं झालें तरी श्रीकान्त हा एक सुविद्य, अभिजात संस्कृतीचा तरुण होता. तो मधुनमधून आपल्या मनाला कठोरपणे बजावीत होता, कीं 'हां ! या भलत्याच मोहांत पडूं नकोस. या प्रलोभनाच्या आसपासहि तू फिरकूं नकोस. असल्या उन्मादाचे परिणाम किती भयंकर होतात, ते तुला ठाऊक नाहीं ?'

श्रीकान्ताने झोपीं जातांना शेवटीं मनाशीं निश्चय केला, कीं माझ्या प्राणप्रिय नन्दाच्या मधुर प्रेममधूचा आस्वाद घेतच मी माझे सारें आयुष्य कंठीन ! नन्दाचें प्रेम इतक्या उच्च दर्जाचें आहे, कीं ते माझ्या मनाला सर्व जन्मभर पूर्ण तृप्ति द्यावयाला समर्थ आहे !

नाहीं—उद्यां आतां मुळीं फ्लोराला भेटायला जायचेंच नाहीं ! कांहीं झाले तरी नाहीं ! ती उठून तर कांहीं आपल्या भेटीला येत नाहीं ? छेः—नकोच तो मोह ! माणसाचे मन दुर्बल ! मोहाने तें कधीं फसेल, याचा नेम का आहे ?

* * *

परतु दुसऱ्या दिवशीं ऑफिसला जाताना श्रीकान्त विशेष काळजीने नीटनेटका पोषाख करूनच गेला. नेहमींपेक्षां उची आणि झकास कपडे त्याने आज पेहेरले.

आपण आज असे कां केले, हे श्रीकान्ताला स्वतःलादेखील नीटसे कळले नाही. फ्लोराला आज भेटण्याची 'एंगेजमेन्ट' ( संकेत ) आपण केली असल्यामुळेच आपण आज असा फिटफाट पोषाख केला, आणि तसे नसते, तर आपण तसा केला नसता, अशी कल्पना करणे हे दुर्बल मनाचे द्योतक आहे, अशी श्रीकान्त आपल्या मनाची समजावणी करूं लागला. आपल्या मनावर फ्लोराचे आकर्षण घडत आहे, हें तो मनांतल्या मनांतहि कबूल करावयाला तयार होईना !

कांहीं झालें तरी काल रात्रीं केलेला निश्चय पाळावयाचा, फ्लोराकडे जावयाचें नाहीं, असेच तो ऑफिसांत आपल्या मनाला वारंवार बजावून सांगत होता.

श्रीकान्त मुजुमदार हा मुंबईच्या 'धि फेडरेटेड बॅंक ऑफ इंडिया' या सुप्रसिद्ध बॅंकेचा असिस्टंट मॅनेजर (सहकारी व्यवस्थापक) होता. त्याला काम भरपूर असल्यामुळे फ्लोराविषयींच्या विचारतरंगांवर पोहावयाला त्याला फारशी फुरसतच नव्हती!

साडेचारांच्या सुमाराला तो कामांतून बराचसा मोकळा झाला; तेव्हां त्याच्या मनांत झपाट्यानें चलबिचल सुरू झाली. त्याचा निश्चय हळुहळू पातळ होऊं लागला.

पांच वाजतां ऑफिस सोडतांना श्रीकान्ताच्या मनाचें चांचल्य परमावधीला जाऊन पोचले. त्याच्या खिशांत फ्लोराने 'आठवणी'-साठीं त्याला देऊन ठेवलेला तो सुगंधित रुमाल होता; त्याच्या सुगंधाने आणि अस्पष्ट स्पर्शानें त्याचें मस्तक भ्रमण करूं लागले.

वारंवार त्या रुमालाच्या खिशाकडे त्याचा हात जाऊं लागला. बोटानीं रुमालाचें टोक किंचित् चुरगळीत श्रीकान्त मनाची समजावणी करूं लागला—कबूल केल्याप्रमाणे फ्लोराचा हा रुमाल जर आपण आज परत दिला नाहीं, तर ते अतिशय असभ्यपणाचे कृत्य होणार आहे! अगोदरच साहेब आपणाला रानटी समजतात—आणि हा तर फ्लोराला प्रत्यक्ष पुरावाच मिळणार आहे! फ्लोरा मनांत म्हणेल, की हे सारे 'नेटिव्ह' लोक असेच रानटी! कर्तव्याची कल्पनाहि त्यांना सुतराम् नाहीं!

साऱ्या हिंदी समाजाची—साऱ्या हिंदी राष्ट्राची—ही बदनामी नाहीं का? ती व्हायला आपण कारण व्हायचे? म्हणजे पर्यायानें आपण समाजद्रोही—राष्ट्रद्रोही बनायचें! छीः!

आणि तसें म्हटलें तर, फ्लोराला आज जाऊन नुसतें भेटण्यांत असा दोष तरी काय आहे? ती कांहीं रोजच्या रोज आपणाला घरीं यावयाचें निमंत्रण करीत नाहीं आहे! सहज काल परिचय झाला, बोलीभाषण

झाले, म्हणून तिनें आज आपणाला भेटायला बोलावलें. सभ्य माणसांची रीतच अशी! म्हणून कांहीं ती आपणाला रोज बोलवायला बसली नाहीं!

आणि समजा, फ्लोरा अत्यंत रूपसुंदर असल्यामुळें आपल्या दुर्बल मनाला तिच्या मधुर लावण्याचा मोह पडला, तरी त्यापासून वाईट असे काय निष्पन्न होणार? फ्लोरासारखी राज्यकर्त्यांच्या जातीची गौरांगना, आपणावर प्रेम करील, किंवा आपणाला तशी विशेष लगट करूं देईल, हे नुसतें शक्य तरी आहे का? हाः हाः! असली कल्पना मनांत आली, कीं हंसूं येतें!

आपणाकडून फ्लोरावर जे काल थोडे उपकार झाले, त्यांची फेड ती आज ही अशी 'एंगेजमेन्ट' करून करीत आहे,—यावांचून तिचा अन्य कोणता हेतुच असणें शक्य नाहीं, असे श्रीकान्ताने आपल्या मनाला तीनतीन वेळ बजावले; आणि शेवटीं कायम मनांत निश्चय केला, कीं आपल्या जातीच्या सभ्यतेला बाध येऊं नये, 'नेटिव्हां' विषयीं फ्लोराची भलतीच भावना होऊ नये, म्हणून तिच्या निमंत्रणाला केवळ आजच्यापुरता मान देऊन तिला भेटावयाला जावयाचे! इतर सर्व कल्पना झुगारून हे कर्तव्य आपणाला आज केलेच पाहिजे—गत्यन्तरच नाहीं त्याशिवाय!

पण यानंतर मात्र फ्लोराच्या चतुःसीमेतहि कधीं फिरकायचे नाहीं!

* * *

आपले 'व्हिजिटिंग कार्ड' बॉय (छोकऱ्या)बरोबर श्रीकान्ताने वरतीं पाठवून दिले.

दोन मिनिटांच्या आंतच तो परत येऊन सलाम करून म्हणाला,

"मेमसाब उपर हैं, हुजूर! आपको सलाम दिया–चलिये—"

फ्लोरा ड्रॉइंगरूम (दिवाणखान्या)मध्ये बसली होती. श्रीकान्त येतांच कोचावरून चटकन् उठून पुढे येऊन हंसत हंसत ती म्हणाली,

'गुड आफ्टरनून, मिस्टर–अ–अ–मुजमुदार! (नमस्कार)बरंच लवकरसं येणं केलं? सहा वाजायला अजून तब्बल अर्धा तास आहे कीं अवकाश!"

बिचारा ‘ नेटिव्ह ’ श्रीकान्त संकोचानें आणि शरमेनें एवढासा झाला! दुसरीकडेच नजर लावून तो म्हणाला,

“ गुड आफ्टरनून ! ऑफिसमधून मी सरळ इकडेच आलों, मिस् टेम्पल ! त्यामुळ किती वाजले हे पहायचं मुळीं ध्यानांतच राहिल नाहीं पहा ! एक्स्क्यूज हं ! ( क्षमा करा ) मी थोडा फिरून येतों. थोडं या बाजूला महत्त्वाचं कामहि आहे माझं—”

श्रीकान्ताला मध्येंच अडवून, मोठ्यानें हंसत हंसत फ्लोरा म्हणाली,

“ छे छे छे ! आपणाला जायची मुळींच जरूर नाहीं, मिस्टर मुजमुडार! इतकं पंक्चुअल ( वक्तशीर ) व्हायला नको कांहीं सरळ खेड्यामध्यें ! आपण ठरल्या वेळापेक्षां लवकर आलां, हें पाहून मला तर भारीच बरं वाटलं पहा—”

आतां कुठें श्रीकान्ताच्या जिवांत जीव आला ! म्लानपणें हंसून तो म्हणाला,

“ खरंच बरं वाटलं तुम्हाला, मिस् टेम्पल ? थँक्स ( धन्यवाद ). छेः—पण काय ? आपल्या रुमालाची नुसती गोष्टदिखील नाहीं काढली ती आपण ?”

स्मितपूर्वक फ्लोरा म्हणाली,

“ खरंच, चुकलें बाई ! ध्यानांतच नाहीं मेलं ! आणला आहेत का ? ”

रुमाल पुढें करून श्रीकान्त म्हणाला,

“ वा—म्हणजे ! आणायला विसरेन का ? झालच मग ! घ्या ना हा—ऑफिसांत येतांना नीट घालूनच ठेवला होता कोटांत ! ”

श्रीकान्ताचा हात धरून फ्लोरा म्हणाली,

“ बरं बरं—राहूं द्या ! हा आपला तुमच्याजवळ माझी ठेव म्हणून असूं द्या, मिस्टर मुजमुडार ! जेव्हां जरूर लागेल तेव्हां मागून घेईन तुमच्याजवळून हा मी—”

श्रीकान्ताच्या हातीं जणूं स्वर्गच आला ! तो उल्हासानें म्हणाला,

“ थँक्स ! ”

## तीन .... .... .... .... थोडी चुणूक !

पंधरा दिवस उलटले आहेत.

एवढ्या अवकाशात आमच्या कथानकांत बरीच उलाढाल झाली आहे. तिचे थोडक्यांत असें वर्णन करतां येईल, कीं जे कांहीं करावयाचें असा श्रीकान्ताने मनाशीं निश्चय केला होता, ते त्यानें मुळींच केलें नव्हतें; आणि जें करावयाचे नाहीं, असे त्याने ठरविले होते, तेंच करावयाला त्याने खूब जोरानें आरभ केला होता ! त्याच्या मनाला आवाक्यांत ठेवणारा विवेकाचा लगाम हळुहळू शिथिल होत आला असून, एकाद्या बेफाम घोड्याप्रमाणे ते आता स्वैरेच्छेनें धांवत सुटले होते.

रूपयौवनसंपन्न फ्लोराची पहिली भेट झाल्यापासून श्रीकान्ताचे मन त्याच्या ताब्यांत मुळींसुद्धां राहिले नव्हतें. तिच्या मधुर सहवासांत त्याला स्वर्गानंद वाटूं लागला; आणि त्या सुखाची चटक त्याला इतकी लागून राहिली, की फ्लोरावांचून त्याला कांहीं दिसेना व सुचेना ! एकादें ' भूत ' झाडाला धरते, त्याप्रमाणे या घोर नशेंने त्याला घेरलें !

ऑफिस सुटते न सुटते तोच श्रीकान्त फ्लोराकडे धांवत येई. कधीं तीं उभयतां याप्रमाणें फ्लोराच्या बिऱ्हाडीं एकत्र होत, तर कधीं आगाऊ संकेताच्या ठिकाणीं भेटत.

नतर तीं उभयतां कुठे तरी फिरावयाला जात, आणि बरीच रात्र झाल्यावर परत येत.

श्रीकान्ताला अर्थातच घरीं यावयाला अतिशय उशीर होई.

सुनन्दा सहजच विलंबाचे कारण विचारी. तेव्हां कपाळावर आंठ्या चढवून श्रीकान्त उत्तर देई,

" अग, बोलून चालून नोकरीचे गुलाम आम्ही ! ऑफिसचं काम अलीकडे असं कांहीं भलतंच वाढलं आहे म्हणतेस ! बॅंकेचा सारखा

जगभर पसारा वाढतो आहे! भागिदारांचा होतो फायदा, पण आमच्यासारख्या नोकरांचा जातो जीव! काम म्हणून काम वाढलं आहे अलिकडे? बरं, डायरेक्टरांना तरी आमची काय परवा? एक सोडून छप्पन हजार नोकर त्यांना काम करायला चुटकीसरसे मिळतात! काय करणार, बोल! नोकरी तर टिकायला हवी? नाहीं तर खायचं काय?"

बिचारी सुनन्दा! हिंदु स्त्री! पतिराजांच्या बोलण्यावर सहजच तिचा विश्वास बसे! श्रीकान्ताची थापाथापी अजून तिला नवीच होती!

सुनन्दाला पतीचा उलट कळवळाच अतोनात येई. सहानुभूतीच्या स्वरानें ती म्हणे,

"तें खरं. पण उशिराला कांहीं प्रमाण? साहेबांना काय मेल्यांना! मी म्हणतें, कीं अशा विलक्षण श्रमांनीं हाडामांसाचं शरीर टिकेल तरी कसं? साहेब जर नसतील ऐकत, तर आपण आपली नोकरी द्यावी सोडून बेलाशक! एक सोडून छप्पन नोकऱ्या मिळतील! अंगांत अशी विद्या न् हुषारी असल्यावर नोकऱ्यांना काय गेलाय् तोटा!"

पत्नीच्या गालावर एक नाजुक चापटी मारून हंसत हंसत श्रीकान्त म्हणे,

"वेडी आहेस झालं! सध्यांच्या जगाचा अनुभव नाहीं तुला!"

फ्लोराच्या मधुर सहवासांत श्रीकान्ताचा सध्याकाळचा वेळ एकाद्या रम्य सुखस्वप्नासारखा केव्हांच निघून जाई! एवढा वेळ गेला तरी केव्हां, याचे त्याला ध्यानहि रहात नसे! अगदीं नाइलाज झाला, म्हणजे तो परत फिरे!

श्रीकान्ताला वारंवार अशी प्रबल इच्छा होई, कीं फ्लोराच्या अगदीं जवळ, तिला अगदीं खेटून सहल करण्यांत सारी रात्र घालवावी! फ्लोराच्या मधुमधुर संभाषणाच्या प्रवाहांत एकसारखे निमज्जन करीत रहावें! मग सगळे जग बुडालें, तरी त्याची पर्वा आपणाला नाहीं, अशी त्याची भावना झाली होती!

मधुनमधून श्रीकान्ताच्या हृदयांत एक विलक्षण उद्दाम लालसा खेळूं लागून त्याच्या मस्तकाला अगदीं बेफाम करून सोडी! मदिरेचा

प्रबल उन्माद त्या मदिराक्षी तरुणीच्या सहवासांत त्याला मधुनमधून अतिशय चढे ! तिचा लाभ आपणाला होतो आहे, त्यापेक्षां अधिक निकट, निबिडतर सहवास आपणाला मिळावा, असें त्याला वाटे, आणि तो अगदीं बेचैन होऊन जाई !

परंतु तेवढें साहस आणि धाडस श्रीकान्ताला होत नसे !

यापूर्वी श्रीकान्ताला इंग्रज स्त्रियांशीं मिळण्यामिसळण्याचा प्रसंग कधींहि प्राप्त झाला नव्हता. इतकेंच काय, परतु इंग्रजांच्या चालीरीति काय आहेत, त्यांचे शिष्टाचार काय आहेत, याचीहि त्याला प्रत्यक्ष माहिती नव्हती. सिक्स पेनी (सहा आणेवाल्या) कादंबऱ्या, गोष्टी, सिनेमाचीं कथानकें आणि क्वचित् नियतकालिकांत वाचलेलीं प्रवासवर्णने यांमधून त्याला अप्रत्यक्ष अशी थोडीशी कांहीं माहिती झाली असेल तेवढीच !

यामुळें, फ्लोराचे चपल कटाक्ष, मधुर स्मित, मोकळे हंसणें आणि निष्कपट बोलणेंचालणे हीं पाहून श्रीकान्ताला वाटे, कीं ही युरोपीय तरुणी खात्रीने आपणावर अगदीं फिदा झाली असली पाहिजे ! व्हिक्टोरिया क्रॉस वगैरे कित्येक आंग्ल लेखिका-लेखकांच्या कादंबऱ्यांत आणि गोष्टींत अशा 'नेटिव्हां'वर उन्मत्त प्रेम करणाऱ्या गोऱ्या तरुणींचीं उदाहरणे त्यानें वाचलीं होतीं. त्यांचें हे प्रत्यक्षीकरणच, असे त्याच्या मनाला मधुनमधून, पण अगदीं स्पष्टपणे भासे !

परंतु लगेच श्रीकान्ताला वाटे, कीं छेः ! आपली कांहीं तरी चूकच होत असली पाहिजे ! ही आंग्ल तरुणी आपणासारख्या 'निगर' वर अंतःकरणपूर्वक प्रेम कां म्हणून करील ? असे आपल्या ठिकाणीं तरी रूप-गुण काय आहेत ? फ्लोराचे पुरुष मित्र अनेक असतील, त्यांतच तिने आपणालाहि स्थान दिलें असेल ! आपणाशीं तिच्या होणाऱ्या चालचलणुकींत अनुराग किंवा प्रेम नसून केवळ निर्मल स्नेह मात्र असण्याचा संभव अधिक आहे !

आणि ही कल्पना मनांत आली, कीं श्रीकान्ताचे हृदय अगदीं हुब-कूनच जाई!

*          *          *

सकाळीं 'बॉय'ने येऊन श्रीकान्ताला एक लिफाफा दिला, व सलाम करून तो निघूनहि गेला.

फ्लोराने पत्रांत अवघ्या तीन कीं चार ओळीच लिहिल्या होत्या—

" प्रिय मुजमुडार,

आज संध्याकाळी आपणां दोघांच भोजन एकाच टेबलावर, बर का! नंतर आपण खूब खूब लांब फिरायला जाऊं. बरोबर साताला तुम्ही या. वाट पहात बसते अं मी!

आपली,

फ्लोरा टेम्पल"

श्रीकान्ताचा तो सगळा दिवस स्वर्गसुखानदांत गेला!

आपल्या बाबतींत 'पंक्चुआलिटी'च्या शिष्टाचाराची मुळींच जरूरी नाहीं, हे फ्लोराने त्याला स्वच्छ कळविले असल्यामुळे, सव्वासहालाच तो फिटफाट पोषाक करून आपल्या वल्लभेकडे जावयाला तयार झाला.

घराबाहेर पडतांना श्रीकान्त सुनन्दाला म्हणाला,

" हे पहा, रात्र होईल अं मला यायला, नन्दा! आमच खाणं आज बाहेरच. तेव्हां आमचे तांदुळ कांहीं वैरू नका—"

सुनन्दा त्याच्याकडे पहातच राहिली! तिच्या मनांत काय विचार आला कोण जाणे! तिने अधरोष्ठ दंताग्रांनीं किंचित् चावल्यासारखे केलें, आणि मान फिरवून ती खिडकीच्या बाहेर पाहूं लागली.

श्रीकान्त आपली ऐटदार छडी हातीं घेऊन बाहेर पडणार होता; परतु पत्नीच्या चेहऱ्याकडे नजर जातांच त्याला अमळ कसेंसेंच वाटलें. तो जागच्या जागीं थबकला, आणि चेहऱ्यावर बळेंच स्मितरेखा उमटविण्याचा प्रयत्न करून तो म्हणाला,

" कां—काय झालं ? "

गंभीरपणाने सुनन्दा उत्तरली,

" कुठं काय ? कांहीं नाहीं बाई ! "

सुनन्दा आपणापासून कांहीं तरी लपविण्याचा प्रयत्न करीत आहे, हें तत्क्षणीं जाणण्याइतका श्रीकान्त चाणाक्ष होता. त्याला प्रेयसीकडे जावयाची पराकाष्ठेची उत्कंठा होती, हें खरें आहे. तरीहि, सुनन्दा ही त्याची विवाहित अर्धांगी असल्यामुळें, त्याच्या हिंदु, अभिजात, सुसंस्कृत मनाला अजूनपर्यंत तरी तिचा एका प्रकारचा दरारा होता. एकाद्या क्षुल्लक गोष्टीसाठीं, शक्य तर पत्नीचें मन आपणाविषयीं कलुषित होऊं नये, असें त्याला सहजच वाटत होतें. श्रीकान्ताचें मनहि पापी होतें; त्यामुळें आपल्या दोषास्पद वर्तनाचा उडता संशयहि सुनन्दाला येऊं नये, अशी त्याची तीव्र इच्छा होती.

श्रीकान्त दरवाजाजवळून दोनतीन पावलें आपोआप मागें सरला. सुनन्दाच्या चेहऱ्याकडे त्यानें एकवार पाहिलें, आणि लगेच नजर दुसरीकडे वळवून तो म्हणाला,

" कांहीं नाहीं, म्हणून म्हटलंस तूं ! पण अशानं फसणार नाहीं हं मी बिलकुल ! सांग ना ग--काय विचार आला मनांत तुझ्या ? "

" खरंच—कांहीं नाहीं." सुनन्दा कांहींशी तुटकपणे म्हणाली.

श्रीकान्त आणखींही पाऊलभर पुढें सरला, व इकडे तिकडे पाहून अर्धांगीचा हात पटकन् आपल्या हातीं घेऊन म्हणाला,

" असं काय बरं ? सांग ना—"

पतिराजांच्या या प्रेमकोमल वर्तनाचा सुनन्दाच्या मनावर बराच परिणाम झाला असावा असें दिसलें. भाबडी—' हिंदु ' स्त्री ती बोलून-चालून ! तिच्या मनाला चाटून गेलेली छोटीशी कलुष कल्पना तत्क्षणीं पार नष्ट झाली. इतकेंच नव्हे, तर आपल्या मनांत पतिराजांविषयीं क्षणभर कां होईना, वाईट विचार येऊन गेल्याबद्दल तिचें तिलाच वाईट वाटलें.

पतीच्या हातांतून हात सोडवून घेण्याचा मृदु, परंतु यशस्वी प्रयत्न करीत सुनन्दा हंसत म्हणाली,

" इकडचा इतका आग्रहच आहे म्हणून सांगतें—मला आपला थोडा राग आला होता—"

तिच्या तोंडाकडे पहात श्रीकान्तानें क्षणभर थांबून विचारलें,

" राग—कां म्हणून ?"

सुनन्दा स्मितपूर्वक म्हणाली,

" उलट मलाच विचारायचं का ? शाब्बास बाई ! आजहि—आजहि—"

पतीच्या चेहऱ्याकडे पाहून सुनन्दा मध्येंच थांबली, व खालीं पाहूं लागली.

" आजहि काय ? सांग ना—"

" रोजचं असो मेलं !" सुनन्दा कांहींशा गंभीरपणें म्हणाली. " अलीकडे रोजच घरच्या जेवणाचे हे असे तीन तेरा होताहेत; पण आज तरी घरीं जेवण होईल असं मला वाटलं होतं. पण इकडे तर आजदिखील—"

" नाहीं ग—आजहि जरूरीचं काम आहे—नाहीं तर—"

श्रीकान्ताला पत्नीच्या चेहऱ्याकडे पहावे ना ! त्यानें बलपूर्वक खिडकींतून दुसरीकडे पहाण्याचा बहाणा केला.

" कसलं आजदिखील मेल काम ?" सुनन्दा तीव्र स्वरानें म्हणाली. " कुठं कसलं एवढ काम आहे तें सांगावं ना ?"

श्रीकान्त क्षणभर थांबला, आणि एकवार आंवढा गिळून म्हणाला,

" दुसरं कुठं ? मॅनेजरसाहेबांकडेच—"

" आजदिखील ?" जरा रागानेच सुनन्दा उद्गारली.

" हो ना—आजच नसायला काय झालं ?" पूर्ववत् बाहेर दृष्टिक्षेप करून श्रीकान्त म्हणाला.

" आज सुट्टीचा वार, हें ध्यानांत आहे ना ?" पतीच्या चेहऱ्याकडे नजर लावून सुनन्दानें विचारलें.

श्रीकान्ताचा चेहरा किंचित् फिका पडला. परंतु त्यानें प्रयत्न करून आपणाला चटकन् सांवरून घेतलें. कृत्रिम हास्य करून तो म्हणाला,

" वा ! वकिली पांचपेंचाचे प्रश्न करून मला कुंठित करायला पहाते आहेस वाटतं ? पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. सकाळीं कोण आला होता, ते पाहिलं नाहींस वाटतं ? "

" कोण ? "

" मॅनेजरसाहेबांचा चपराशी ! त्यानंच तर त्यांची चिठ्ठी आणली. आज सुट्टीचा दिवस—संध्याकाळचं जेवण आज तरी मोठ्या मजेंत घरीं बायको-मुलीबरोबर आनंदानं करीन, अशी कालपासून मी किती आशा करीत होतों; पण नशीब खडतर, त्याला काय करणार ? आजहि त्यानं घात घेतलाच ! गुलामांच्या भोगीं स्वातंत्र्याचा लेशहि नाहीं हेच खरं ! "

असें म्हणून, आपल्या या 'डावा'चा परिणाम सुनन्दाच्या मनावर किती झाला, हें पहाण्याकरतां श्रीकान्त धिटाईनें तिच्या चेहऱ्याकडे पाहूं लागला.

सुनन्दाच्या भाबड्या मनावर या थापेचा परिणाम चांगलाच झाला असावा, असें दिसलें. तिनें सहानुभूतीच्या स्वरानें विचारलें,

" काय आली होती चिठ्ठी साहेबांची ? "

" अग, कसचं काय अन् कसचं काय ? " आपली थाप चांगली पचली, असें पाहून श्रीकान्त उत्तेजित स्वरानें म्हणाला. " शेवटीं बारा वळसे अन् एक गांठ ! नोकरांच्या नशिबीं स्वतंत्रता नाहीं ! आज सुट्टी खरी; परंतु आमच्या लंडन-ऑफिसचे एक बडे साहेब आले आहेत कालच मुंबईला. त्यांना मद्रासला जायची आहे घाई. ऑफिसचं काम-बीम काय तें कालच उरकलं. तेव्हां आम्हांला वाटलं, कीं बुवा आतां सुटलों. पण नाहीं—मॅनेजरसाहेबांनीं आपल्या बंगल्यावर त्यांना खाना द्यायचा बूट काढला, अन् त्याचंच तर निमंत्रण सकाळीं आलं त्यांच्याकडून. आमच्या मनांत कांहीं असलं तरी न जाऊन कसं भागतं ?—सांग तूंच. एकादा छोटासा कारकून बिरकून असतों, तर ही आफत

आलीच नसती. पण ऑफिसर पडलों ना आम्ही! तेव्हां मोठेपणाची ही शिक्षा मुकाट भोगलीच पाहिजे आम्हांला—इलाज नाहीं—"

"जळलं मेलं तें ऑफिस! दिवस नाहीं रात्र नाहीं—सुटी नाहीं—फुरसतनाहीं! मेल्या त्या साहेबांना बायकापोरं कुणी असतात का नाहीं?"

श्रीकान्त आतां पूर्णपणें 'मुक्त' झाला होता! मनाच्या समाधानानें हंसत हंसत तो म्हणाला,

"तें खरं ग! पण पोटापुढं काहीं इलाज नाहीं! बरं, गेला सारा मनांतला राग अन् किल्मिष? कांहीं असलं पोटांत तर—पहा अं—"

"जावं गडे—भलतंच आपलं—"

* * *

वल्लभेच्या भेटींत निष्कारण उद्भवलेल्या या अंतरायाबद्दल श्रीकान्ताला मनांत बायकोचा खूब राग आला असला, तरी त्याला कांहीं इलाज नव्हता. टॅक्सी वायुवेगाने निघाली होती, तरी त्याच्या आतुर मनाला तो अतिशय सावकाशच वाटत होता.

दरवाजाशीं बसलेल्या 'बॉय्'ने सलाम करून म्हटले,

"मेमसाब ड्रेसिंग-रूममें है, हुजूर—"

"अच्छा"

असें म्हणून श्रीकान्त दिवाणखान्यांत जाऊन बसला. येतांक्षणींच हृदयवल्लभा दृष्टीसमोर दिसू नये, याचा त्याला विषाद वाटला. जवळच्या टेबलाजवळ पडलेलें एक इंग्रजी मासिक घेऊन ते तो विमनस्कपणें चाळूं लागला.

पांचदहा मिनिटे गेलीं; तरी फ्लोराचा पत्ता नाहीं! श्रीकान्ताला थोडा रागच आला. हातांतील पुस्तक चाळीत तो हताश भावानें बसून राहिला.

इतक्यांत बाजूच्या जिन्याकडून, एक फिटफाट पोषाख केलेला युरोपियन तरुण येऊन आपणाकडे तीव्र, कठोर नजरेनें पहात खालीं निघून गेला, असें त्याला आढळून आलें.

कोण हा तरुण ? आणि या अशा वेळीं तो येथें कां ? अनेक ांकाकुशंकांनीं श्रीकान्ताचें मन पराकाष्ठेचे अस्वस्थ झालें.

इतक्यांत पोषाख करून फ्लोराहि दरवाजाचा पडदा बाजूला करून आंत आली, व हंसत हंसत म्हणाली,

" ईव्हिनिंग, मिस्टर मुजमुडार ! "

" ईव्हिनिंग—"

परंतु श्रीकान्ताचे उतावळें मन त्याला स्वस्थ राहूं देईना ! दुसरा कसला विचार न करतां त्यानें फ्लोराला एकदम प्रश्न केला,

" आतां या बाजूनं कोण गेला बरं, मिस् टेम्पल ? "

फ्लोरा जरा गडबडल्यासारखी दिसली. परतु लगेच घाईने ती म्हणाली,

" कोण–कुठं ?—कुणी नाहीं बाई ! "

" नाहीं कसं ? या जिन्याकडून तर आतांच एक छोकरा गेला—"

फ्लोरा चारदोन क्षण थांबली, व आंवढा गिळून म्हणाली,

" हं–हं—शेजारच्या फ्लॅटमधला असेल कुणी ! "

ओः ! या इमारतींत इतरहि फ्लॅट असून त्यांत लोक रहात असतील, ही कल्पना आपणाला कशी आली नाहीं ! छीः !

श्रीकान्ताचें पूर्ण समाधान झाले !

वल्लभाकडे पहात मधुर हास्य करीत फ्लोरा म्हणाली,

" लिहिल्याप्रमाणं तुम्ही अगदीं वेळेवर आलां, मिस्टर मुजमुडार ! सो व्हेरि काइंड ऑफ् यू ! ( किती प्रेमळ आहां तुम्ही ! ) बरं, निघायचं ना ? "

" हो ना—कुठं जायचं डिनरला ठरवलं आहां तुम्ही, मिस् टेम्पल् ? "

" कुठंहि—एकाद्या चांगल्या रेस्टोरांमध्यें—"

" मॅगिनी–एक्सलशियर–ताजमहाल–वॉटसन्–कुठं जाऊं या बर ? "

प्रियकराकडे प्रेमपूरित दृष्टिक्षेप करून फ्लोरा लडिवाळपणें म्हणाली,

" नको बाई---हीं सारीं ठिकाणं भारी महाग! आपल्या अंथरुणा-कडे पाहून आपणाला पाय पसरायला नको का ? "

तुच्छतेच्या स्वरानें श्रीकान्त म्हणाला,

" तें असूं द्या हो!—इम्पीरियल कसं वाटतं तुम्हाला ? "

मांन डोलवून फ्लोरा उद्गारली,

" ओ:--ग्रँड सिम्पली ! ( भारीच उमदं ठिकाण ! ) "

" चला तर ! "

## चार .... .... .... मदिरा आणि मदिराक्षी

कोटांतल्या इंपीरियल रेस्टोरॉंमधील एका प्रायव्हेट केबिन ( खासगी खोली ) मध्यें सुसज्जित टेबलाच्या दोन बाजूंना, परस्परांकडे तोंडें करून, श्रीकान्त आणि फ्लोरा बसलीं.

हुकुमाच्या अपेक्षेनें वेटर( वाढपी )ही जवळ नम्रपणें उभा होता.

वल्लभाकडे पाहून फ्लोरानें प्रश्न केला,

" आपणाला काय आवडतं, ते कांहीं मला ठाऊक नाहीं, मिस्टर मुजमुडार! सांगा ना—काय ऑर्डर देऊं ? "

श्रीकान्त उत्तरला,

" तुमच्या इच्छेला येईल ते आणयला सांगा—"

हंसून फ्लोरा म्हणाली,

" मला आवडेल तें ? पहा अं, मिस्टर मुजमुडार! पस्ताव्यांत पडाल मागून! माझ्या आवडीचे पदार्थ आपणाला चालतील का ? "

श्रीकान्त उत्साहानें म्हणाला,

" चालतील म्हणजे ?—अवश्य चालतील! तुमची आवड अन् माझी आवड का भिन्न आहे, मिस् टेम्पल ? तुम्ही न् मी का दोन आहों ? हां—पण एक आहे अं थोडंसं—बीफ ( गोमांस ) तेवढं नाहीं मला चालण्यासारखं! "

फ्लोरा मृदु हंसली.

" मला ठाऊक आहे पण तें! हिंदुलोक बीफ खात नाहीत. तसं म्हणाल, तर मीदेखील नाहीं खात बीफ कधीं फारसं—"

श्रीकान्तानें कुतूहलानें विचारलें,

" कां बरं ? "

" भारी गरम पडतं तें, न् मग त्रास होतो—"

शेवटी फ्लोरानें ऑर्डर ( हुकूम ) दिली.

थोड्याच वेळांत ते सर्व पदार्थ घेऊन वेटर परत आला, आणि टेबलावर त्या प्लेटी सोयीस्कर रीतीने मांडून निघून गेला.

खातां खातां श्रीकान्त आपल्याशींच किंचित् हंसला.

फ्लोराच्या तें ध्यानांत आलें. तिने विचारलें,

" कां ?—हंसलातसे, मिस्टर मुजमुडार ? "

" नाहीं–उगीच. कांटा–सुरीनं माझं हें खाणं म्हणेज तुम्हाला एका प्रकारची लढाईच भासत असेल, नाहीं ? मनांतल्या मनांत तुम्ही हंसत असाल—"

फ्लोरा किंचित हंसली, व म्हणाली,

" नाहीं—हसूं कशाला ? पण कांटा उजव्या हातीं नाहीं घ्यायचा–डाव्या हातांत. मला वाटतं, आपणाला सुरीकांट्याची फारशी संवय नसेल—"

श्रीकान्तानें प्रेयसीच्या सूचनेप्रमाणें ताबडतोब आपल्या चुकीची दुरुस्ती केली, व तो म्हणाला,

" थॅंक्स ! तुमची कल्पना बरोबर आहे. कांटा–सुरीचा फारसा कां, आम्हांला मुळींच सराव नसतो—"

" मग ? "

" आम्ही नुसत्या हातांनींच खातों—" असें म्हणून श्रीकान्त किंचित् हसला.

फ्लोरा स्मितपूर्वक म्हणाली,

" मग खा ना हातांनींच तुम्ही, मिस्टर मुजमुडार ! ज्याची त्याची रीत ज्याला त्याला प्रियच असते. इथ माझ्यापाशीं उगीच एटिकेट ( शिष्टाचार ) बाळगायचं कांहीं कारण नाहीं–उगीच त्रास कशाला ? "

" नाहीं नाहीं–त्रास कसला ? माणसाला सगळ्याची माहिती पाहिजेच. तेवढाच सराव होईल मला तुमच्या शिक्षणामुळं—"

हास्यविनोदामध्यें खाणें सुरू झालें.

टेबलाच्या एका बाजूला व्हिस्कीची एक बाटली आणि सोड्याचा फाउंटन् होता. तिकडे लक्ष्य जाऊन फ्लोरानें हांक मारली,

"बॉय्—"

दरवाजाचा पडदा बाजूला करून 'बॉय्' आत आला.

फ्लोरानें हुकूम दिला,

"दो गिलासमे दो पेग डारो—"

"जी हुजूर!"

श्रीकान्त घाईघाईने म्हणाला,

"मी तर हे पेय घेत नाहीं, मिस् टेम्पल! कृपा करून माझ एक ग्लास रोज क्रश किंवा लेमनस्क्वॅश मागवा ना—"

किंचित् हंसून फ्लोरा म्हणाली,

"नाही घेत? हः! सिली गुड बॉय्! (खुळचटपणाच हा तुमचा!) पण माहीत आहे का तुम्हाला, मिस्टर मुजमुदार? हे घेणं तुम्हाला अवश्य—अगदीं अवश्य आहे!"

वल्लभेकडे कौतुकाने पहात श्रीकान्ताने हंसून विचारले,

"अवश्य आहे? कां बरं?"

"नाही तर हे सार खाणं पचणार कसं तुम्हाला?" असे म्हणून फ्लोरा अत्यंत मोहक हसली.

"तें खरं—पण—मिस् टेम्पल—तस—"

"तुम्हीं कधींच का याला स्पर्श केला नाहीं आजपर्यंत?"

क्षणभर थांबून श्रीकान्त म्हणाला,

"कधींच मीं मद्य घेतलं नाहीं, अस मीं म्हटलं, तर तें असत्य होईल. घेतलं आहे प्रसंगीं मीं चार दोन वेळ—पण खरं बोलायचं, तर मलाच तें तितकं आवडत नाहीं. तुम्ही जर परवानगी द्याल मला, मिस् टेम्पल, तर मी थोडं ऑरेंजक्रश घेईन म्हणतों—"

फ्लोराच्या कपाळाला आंठ्या पडल्या. तीव्र स्वराने ती म्हणाली,

"काय, ऑरेंजक्रश?"

" हो—लेमनक्वॅशहि चालेल—"

फ्लोरा एकदम गंभीरपणें, कठोर स्वरानें म्हणाली,

" तुम्हाला चालेल; पण मला नाहींना चालणार! ऑरेंजक्रश, लेमन-क्वॅशबिश असलं कांहींदिखील घेऊं देणार नाहीं मी आज तुम्हाला, मिस्टर मुजमुडार! आपला परिचय झाल्यापासून आज पहिल्यानंच आपण अशीं एका ठिकाणीं डिनर (भोजन) घेत आहो. आज केवढा आनंदाचा दिवस! अन् अशा प्रसंगीं आपण मला गुड लक् (सुदैव) चिंतायचं नाहीं? बरं तरी दिसतं का हे तुम्हाला? नव्हे, माझा तुम्हाला असा स्पष्ट सवालच आहे. खरोखर सांगत्ये तुम्हाला मी, मिस्टर मुजमुडार, कीं तुम्ही जर आज मला ' गुड लक् ' करणार नाहीं, तर मला भारी-भारी–भारी वाईट वाटेल!"

बिचाऱ्या श्रीकान्ताची अतिशय धांदल उडाली! अशा प्रथम आनंद–मीलनाच्या प्रसंगीं वल्लभेच्या मनाला यत्किंचित् दुःख होईल, असें कोणता शहाणा पुरुष वर्तन करील? आणि ही तरुणी तर स्पष्ट सांगतें, कीं आपल्या मनाला थोडेथोडके नाहीं, तर 'भारी–भारी–भारी' दुःख होईल! काय तरी बुद्धि आपली!

श्रीकान्त घाईघाईने म्हणाला,

" छे छे छे छे–मिस् टेम्पल! अगदीं यकिंचित्‌दिखील तुम्हाला वाईट वाटण्याचं कारण नाहीं. आपलं हे सुंदर प्रफुल्ल मुखकमल थोडं तरी कोमेजून गेलेलं मला कसं पहावेल? त्यावर सदोदित हास्याची प्रसन्नताच विराजमान व्हावी, अशीच माझी इच्छा आहे. अगदीं शपथ आहे तुम्हाला–तिळमात्र दुःख करूं नका तुम्ही. आणा तें मी पितों—"

फ्लोराच्या मुखमंडलावरची छाया दूर होऊन तेथें पुनरपि प्रसन्नता दिसूं लागली. ती किंचित् हंसली, आणि तिने व्हीस्कीचें ग्लास श्रीकान्तापुढे केलें.

" हूं! नॉटी बॉय!" (उच्छृंखल पोरगा आहेस तू!)" ती उद्गारली.

श्रीकान्ताला आतां धन्य धन्य झालें! तोहि हंसूं लागला.

"धन्यवाद!" तो म्हणाला. "परंतु तुमची ही प्रशंसा जरा अधिक झाली, असं नाहीं तुम्हाला वाटत, मिस् टेम्पल?"

फ्लोरा हो हो करून हंसूं लागली. ती म्हणाली,

"मी तर म्हणत्यें, कमीच झाली प्रशंसेची मात्रा! 'नॉटिएस्ट बॉयू' म्हणायला हवं होतं मीं!"

अशा हास्यपरिहासांत 'डिनर' (सान्ध्यभोजन) पुरें झाले.

'बिल' येतांच फ्लोरानें खिशांत हात घातला.

तिला घाईघाईनें थांबवून श्रीकान्त स्मितपूर्वक म्हणाला,

"हं हं–तुम्ही नाहीं द्यायचं हं बिल, मिस् टेम्पल! तें होणं शक्य नाहीं. आमच्या मोनॉपली(एकाधिकार)मध्यें तुम्हाला हात घालायचं कारण नाहीं!"

कुतूहलानें फ्लोरा उद्गारली,

"मोनॉपली! म्हणजे काय? माझ्या नाहीं ध्यानांत आलं कांहीं!"

"अशासारख्या प्रसंगीं 'बिल' देणं हा अधिकार केवळ पुरुषांकडेच चालत आला आहे. बायामाणसांचं हें कामच नाहीं. कांहीं झालं तरी माझ्या या जन्मसिद्ध हक्कांत मी तुम्हाला हात घालूं देणार नाहीं, मिस् टेम्पल!"

श्रीकान्ताचा हा विनोद त्याच्या वल्लभेला अतिशय आवडला, असें दिसलें. तिच्या मुखमंडलावर उमटलेल्या रुचिर हास्यप्रभेनें त्यालाहि धन्य धन्य झालें.

'बिला'ची रक्कम आणि वेटरला 'टिप' (बक्षीस) दिल्यावर तीं उभयता उठलीं, आणि बाहेर आलीं.

रेस्टोरॉंच्या व्हरांड्यांत आल्यावर फ्लोरा म्हणाली,

"बरं, आतां पुढं काय? फिरायला जाऊं या ना?"

"तर!"

"कुठं बरं जाऊं या?"

" कुठंहि—मिस् टेंपल, कुठंहि !"

" मला वाटतं, आतां आपण बॅटरीवर जाऊं या—"

'हाउस ऑफ् लॉर्डस्'च्या दोन 'पेग'नीं श्रीकान्ताच्या मनावर आणि देहावर हळुहळू 'परिणाम' करावयाला सुरवात केली होती! या मदिराप्रभावार्व्यातिरिक्त जवळ असलेल्या मदिराक्षीची सहवासमदिराहि त्याच्यावर भरपूर अमल गाजवीत होती! श्रीकान्ताची मदालस दृष्टि फ्लोरावर अगदीं खिळून राहिली होती. त्या गौरांग तरुणीच्या तुषारशुभ्र देहलतेवर एकोणीस वसन्त रूप-रसानें पुष्पित झाले असून लोहचुंबका-प्रमाणे आपल्या हृदयावर तिचे विलक्षण आकर्षण घडून येत आहे, असें त्याला वाटत होते!

मधुनमधून श्रीकान्त आपल्या भ्रान्त मनाला विवेकाचा आवर घालूं पहात होता; परंतु त्याला त्यांत बिलकूल यश येत नव्हते! वाळूंत रुतल्या जाणाऱ्या असहाय व्यक्तीप्रमाणे आपलीहि स्थिति होत चालली आहे, याची श्रीकान्ताला जाणीव होती; परंतु त्याचा कांहीं इलाजच चालत नव्हता!

नाहीं—या पराकाष्ठेच्या प्रलोभनाचा त्याग करणे आपणाला संपूर्णपणें अशक्य आहे! फ्लोराजवळ आज आपण आत्मनिवेदन करावयाचेंच, मग त्याचा परिणाम कांहींही होवो, असा श्रीकान्तानें मनाशीं निश्चय केला.

कंपित स्वराने तो म्हणाला.

" नको, मिस् टेंपल—बॅटरीवर नको—"

" कां बरं ?"

" या वेळीं तिथं बरीच गर्दी असेल—नाहीं ?"

क्षणभर विचार करून फ्लोरा म्हणाली,

" हो, तें खरं. पण मग जायचं कुठं ?"

" तुमची जर कांहीं हरकत नसेल, तर टॅक्सीनं कुठं तरी लांब—खूब लाब जाऊं या. दादर—माटुंगा—सींव किंवा त्याच्याहि पलीकडे कुठं

तरी लांब समुद्रावर किंवा एकाद्या खाडीवर जाऊन हवा खाऊन येऊं आपण—"

श्रीकान्त एवढें कसें तरी बोलून उत्तराच्या अपेक्षेनें फ्लोराच्या तोंडाकडे पहात राहिला.

फ्लोराला श्रीकान्ताचा हा प्रस्ताव अतिशयच पसंत पडला, असें दिसले. उल्हासातिशयाने ती एकदम उद्गारली,

" ओ ! ए व्हेरी गुड आयडिया, इन्डीड ! (खरंच ! भारी नामी कल्पना ! ) खरच, तुम्ही म्हणतां तसच करूं या, मिस्टर मुजुमदार ! खूब-खूब-खूब लाब जाऊ या कुठ तरी फिरायला ! व्हॉट अ नाइस आयडिया ! ( किती नामी कल्पना ! ) अशी सुंदर चांदणी रात्र घरीं बसून फुकट का घालवायची ?"

" थॅंक्स ! माझी कल्पना तुम्हाला पसंत पडली, हे बघून मला अतिशय आनद झाला ! "

" लाब-लांब कुठं तरी चला-गर्दी नसेल अशा एकाद्या ठिकाणीं दोन घटका सहल करण्यांत मजेत घालवूं आपण ! "

" चला—"

टॅक्सी करून तें प्रणयियुग्म सहलीला निघाले.

* * *

सींवच्या स्टेशनच्या पुलापलीकडे टॅक्सी खडी करावयाला सांगून तें जोडपे खाडीकडे निघाले.

चंद्र उगवून दोन तीन घटिका झाल्या होत्या. जवळजवळ पूर्णिमेच्या-सारखेच स्वच्छ टिपुर चांदणे चहूंकडे पसरले होते. खाडीचा लांबलचक पट्टा चमकदार रुप्याचे पत्रे ठोकलेल्या रस्त्याप्रमाणे दिसत होता. चहूंकडे शांत, निर्जन होतें.

खाडीच्या खाऱ्या पाण्यावरून शान्त वायूच्या लहरी मंदमद वहात होत्या. त्या झुळुकींनीं त्या जोडप्याला विलक्षण हुषारी वाटूं लागली.

तो सर्व देखावा पाहून फ्लोरा अगदीं मुग्ध होऊन गेली.

श्रीकान्त म्हणजे वल्लभेची नुसती पडच्छाया! त्याचें सर्व ध्यान तिच्या मुखमंडलाकडे लागून राहिलें होतें.

फ्लोरा मदिराप्रभावानें जडविव्हल स्वरानें उद्गारली,

"ओः! किती सुंदर देखावा! किती गोड या वायुलहरी!"

"किती आनंद झाला मला तुमचे हे उद्गार ऐकून! खाडीच्या कांठाकांठानं आपण जाऊं या—येतां?"

"जरूर—"

दोघेंजणें अगदीं जवळजवळ चालूं लागलीं.

फ्लोराचें सारें ध्यान सभोंतालच्या त्या रम्य दृश्याकडे होते, तर श्रीकान्त तिच्या चेहऱ्याकडे दृष्टि लावून चालत होता. तिच्या प्रसन्नतेमुळें त्याची प्रसन्नता दसपटीने वाढली होती.

चालतां चालतां मध्येंच एकदम आवेगभरानें फ्लोराचा हात धरून श्रीकान्त अतिशय उल्हासानें उद्गारला,

"क्षमा करा मला, मिस् टेम्पल!"

हात त्याच्या हातीं तसाच राहूं देऊन फ्लोराने विचारले,

"क्षमा! कसली क्षमा?"

"तुमच्यासारख्या अत्यंत सुंदर तरुणीबरोबर, अशा शांत, एकांत रमणीय स्थलीं असा विहार करण्यांत पराकाष्ठेची तीव्र मादकता आहे. म्हणून—"

मध्येंच एक लहानसा दगड होता; त्याला ठेच लागून फ्लोरा पडत होती. परंतु तितक्यांतल्या तितक्यांत स्वतःला संभाळून ती एकदम उद्गारली,

"उः! हाउ क्रुएल ऑफ यू! (किती निष्ठुर आहां तुम्ही तरी!)"

श्रीकान्तानें घाबरून विचारलें,

"काय—काय—काय झालं?"

" पडत होतें ना मी आतां! आपल्या बाहूचा विळखा घालून पुन्हां मी पडणार नाहीं असं करा, मिस्टर मुजमुडार!"

मनांतल्या मनांत श्रीकान्त इतका संतुष्ट झाला, कीं जणूं आकाशींचा चांदच आपल्या हातीं आला, असेंच त्याला वाटलें! फ्लोराच्या कमरेभोंवतीं चटकन् आपल्या हाताचा विळखा घालून त्यानें तिला आपल्याजवळ ओढून घेतले, आणि खेदाचा आविर्भाव आणून तो म्हणाला,

" क्षमा—क्षमा करा मला, मिस् टेम्पल! खरोखरच मला अगदीं मनापासून वाईट वाटतं आहे पहा! आतां कांहीं झालं तरी तुम्हाला मी पडूं देणार नाहीं. अगदीं निष्काळजी रहा तुम्ही! बरं, पण कांहीं लागलंबिगलं तर नाहीं ना तुम्हाला?"

मधुर स्मित करीत फ्लोरा म्हणाली,

" थँक्स! कांहीं नाहीं तसं लागलं मला. पण मला वाटतं, अशीं आपण चाललो, तर दोघेहि आपण पडूं एकादी ठेचबीच लागून! अन् मला आतां फिरायचाहि कंटाळा आला आहे—"

" मग काय करूं या तर?"

" वा! हवा कशी छान आहे, अन् चांदणंहि किती गोड गोड पडलं आहे! खाडीच्या या रुपेरी चमकदार तरंगांची रम्य शोभा पहात आपण इथंच कुठं तरी बसूं या."

असें म्हणून फ्लोराने त्याचा हात दाबला.

फ्लोराच्या शरीराच्या किंचिदुष्ण मृदुल स्पर्शानें श्रीकान्ताच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. तिच्या कपड्यावर टाकलेल्या इसेन्सच्या तीव्र सुगंधामध्यें व्हिस्कीची गुलाबी नशा मिसळून श्रीकान्ताच्या मस्तकांत उग्र उन्माद चढत चालला होता!

शेवटीं श्रीकान्त अगदीं पागल झाला!

कंप पावणाऱ्या हातांनीं त्यानें त्या तरुणीला आणखीहि जवळ ओढून घेतलें, आणि धुराजड स्वरानें त्यानें हांक मारली,

" फ्लोरा--"

त्याच्या या कृत्याला फ्लोरानें कांहींसुद्धां अडथळा केला नाहीं; उलट, आपल्या हालचालीने त्याला अधिकच उत्तेजन दिलें.

श्रीकान्ताकडे वक्र कटाक्षपात करून फ्लोरानें विचारलें,

" यस् ( काय )?--"

तिच्याकडे प्रेमव्याकुल दृष्टीनें पहात श्रीकान्त म्हणाला,

" यू रन मी मॅड्, स्वीट गर्ल ! ( गोड पोरी ! तूं तर मला अगदीं पागल बनवून टाकलं आहेस ! ) "

फ्लोराने तशाच दृष्टीची परतफेड केली, आणि प्रेमजड स्वरानें ती म्हणाली,

" डू आय् ? डोन्ट बी नॉटी, प्लीज् ! ( खरंच ? उगीच उच्छृंखलपणा नको करूंस ! ) "

जरा बरीशी जागा पाहून दोघेंहि खाडीच्या कांठीं बसलीं. बसण्यापूर्वीं श्रीकान्ताने रुमालाने ती जागा झटपट झाडून स्वच्छ केली.

बसल्यानंतर श्रीकान्ताने फ्लोराला मृदु बलानें आणखींहि जवळ ओढून घेतली, व तो स्मितपूर्वक म्हणाला,

" किती ग निष्ठुर तरी तुम्ही बायका ? "

या वेळींहि फ्लोराने श्रीकान्ताला कांहीं हरकत केली नाहीं. मदालस दृष्टीनें त्याच्याकडे पहात तिनें विचारलें,

" व्हॉट ? ( काय म्हणतोस तूं ? ) "

" इतकं तरी प्रियकरापासूनचं अतर तुम्हांला सहन कसं होतं ? "

फ्लोराने असलेलें बोटभराचे अंतरहि आतां चटकन् दूर केले, व ती म्हणाली,

" बघ अं ! भलते न् सलते असले आरोप आम्ही सहन नाहीं करणार ! "

श्रीकान्ताच्या धैर्याचा बांध आतां पार भंगून धुळीला मिळाला ! फ्लोराच्या पुष्पित देहलतेभोवतीं त्यानें आपल्या बाहूंचे निबिड आणि घट्ट बंधन घातलें, आणि तिच्या अधरावर आपला अधर टेकला.

वारंवार फ्लोराचें चुंबन घेत श्रीकान्त मृदु कंपित स्वरानें म्हणाला,

" डार्लिंग गर्ल ! माय ओन स्वीट हार्ट ! डू यू माइंड, फ्लोरा ? (माझी प्रियवल्लभा ! केवळ माझी—माझी—माझीच हृदयेश्वरी ! तुझी हरकत आहे फ्लोरा ?)"

श्रीकान्ताच्या खांद्यावर मस्तक ठेवून फ्लोरा कोमल स्वरानें म्हणाली,

" नो, डार्लिंग ! आय लव्ह यू ! ( नाहीं नाहीं––माझं अत्यंत प्रेम आहे तुझ्यावर, जिवलगा ! )"

## पांच .... .... .... संशयाचें काहूर

पतिराजांचें मन अलिकडे मुळींच ठिकाणावर नाहीं, घरसंसाराकडे त्यांचें बिलकुल चित्त नाहीं, ही गोष्ट आतां सुनन्दाच्या चांगलीच लक्ष्यांत येऊन चुकली होती.

अलिकडे बहुधा रोजच्या रोजच श्रीकान्ताला घरीं यावयाला खूब रात्र होत असे. स्वयंपाक आटोपून (सामर्थ्य असताहि सुनन्दानें स्वयंपाकाला बाईब्राह्मण कोणी ठेवला नव्हता, हें येथें सांगणें अवश्य आहे. स्वयंपाकी बायांविषयीं तिचें मत अतिशय वाईट होतें.) पतीची वाट पहात ती तशीच बसून राही. डोळ्यांवर झोंपेची झांपड येई; परंतु जबरदस्तीनें ती उडवून सुनन्दा जागी रहाण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करीत असे.

श्रीकान्त खूब उशीरां घरीं येई. मग कधीं तो जेवीत असे, आणि कधीं मुळींच न जेवतां तसाच झोंपीं जाई. पत्नीला एवढें मात्र तो म्हणे,

" हं, नन्दा, मला बघ आज मुळींदिखील भूक नाहीं. व्यर्थ कशाला पानावर बसायचं सोंग करूं मी ? उगीच रात्र नको करूं आतां. तूं आपली चटकन् घे जेवण उरकून !

सुनन्दा अर्थात्च कारण विचारी.

अशा वेळीं श्रीकान्त सुचेल ते कारण दडपून देई ! कधीं तो म्हणे, ' प्रकृतिच ठीक नाहीं पहा आज, नन्द ! कणकण भरली आहे. जेवणं ठीक नाहीं. लंघनच बरं, नाहीं का ? ' कधीं सांगे, ' ऑफिसचं काम संपायलाच मुळीं आज भयंकर रात्र झाली. मध्यंतरीं भारीच भूक लागली बघ ! तेव्हां काय, गेलो शेजारच्या गुजराती हॉटेलमध्यें, अन् हाणली बारा आण्यांची राईस प्लेट ! ओय्या ! आतां कसच जेवण ? आटोप तूंच लवकर ! ' एकाद्या दिवशीं तो कारण दाखवी, ' गेलो होतो त्या देशपांड्याबरोबर एम्पायरमध्ये सिनेमाला ! भारी सुंदर लागली आहे फिल्म

या आठवड्याला. ऑफिसांतच येऊन बसला–सोडीनाच अगदीं! तेव्हां गेलों झालं! सिनेमा सुटल्यावर त्याच्याच पदरची टिफिनहि झोडली दणकावून!'

अलिकडे बँकेच्या मॅनेजरसाहेबांच्या चिठ्ठयाचपाट्या घेऊन चपराशी तर एकसारखा वारंवार घरीं येऊं लागला होता! बिचाऱ्या सुनन्दाला या साऱ्या प्रकाराचा कांहीं अर्थच कळेना! ती हिंदु स्त्री असली, तरी कांहीं बावळट किंवा भोळी भाबडी नव्हती! कांहीं तरी घोंटाळा आहे; चाललें आहे हें कांहीं ठीक आणि सरळ नाहीं; कांहीं तरी मोठी लबाडी किंवा खोटेपणाचें नाटक चालले आहे, असा संशय, पहिल्यानें अस्पष्ट, व पुढें पुढें चांगला स्पष्टपणें तिला येऊं लागला.

परंतु त्या लबाडीचे किंवा नाटकाचें नक्की स्वरूप काय, हें मात्र तिला कांहींच कळेनासे झालें होतें!

आपल्या वर्तनांत बाह्यतः नन्दाला कांहींच फरक दिसूं नये, याविषयीं श्रीकान्त आपणाकडून शक्य तेवढी काळजी घेतच होता. तिच्याशीं तो हंसे, बोले, थट्टामस्करी करी. परंतु तें कृत्रिमपणें! त्यांत 'फाजी-लपणा' आहे, असें सुनन्दाच्याहि ध्यानांत आल्यावांचून रहात नसे! पूर्वींप्रमाणेंच घरीं येतांच पत्नीशीं तो लडिवाळपणें बोले, हंसे. तिला पूर्ववत् 'नन्दा', 'नन्द' म्हणून संबोधी. मुलीला ओढून जवळ घेऊन तिच्यावर चुंबनांचा वर्षाव करी; पूर्वींप्रमाणेंच मुलीचे आणि आईचे एकदम मुके घेऊन खूब मोठ्यानें तिमजली हंसून घर दणाणून सोडी!

परंतु तें सारे सुनन्दाला अगदीं निष्प्राण, कळाहीन भासे! पति-राजांच्या सर्व 'प्रेमळ' कृतींच्या मागें कसली तरी प्रचंड उणीव, कसला तरी भयंकर अभाव उभा असून, वारंवार बाहेर डोकावून तो आपणाला भेडसावीत आहे, असें तिला वारंवार वाटे!

कसली ती उणीव? तो भयंकर अभाव कोणता? हें एकंदर चाललें आहे तरी काय? कांहीं तरी चमत्कारिक घटना घडून आली आहे, हें निश्चित!

असें काय घडून येण्यासारखें आहे, कोणती विपत्ति आपल्या प्रेम-संसारावर कोसळण्याचा संभव आहे, याविषयीं सुनन्दा आपल्या मनाशीं खूब तर्कवितर्क करी. रात्रीच्या रात्री या विचारांत ती जागून काढी. परंतु त्या ˆ त्तीचे नक्की स्वरूप नुसत्या विचारानें कसे कळून येणार ?

मनाच्या समाधानाला एकच उपाय, म्हणजे प्रत्यक्ष पतिराजांनाच एकंदर चालू प्रकाराचें स्पष्टीकरण विचारून त्यांच्याकडूनच खुलासा करून घेणे, हा होय. परंतु ते कसे शक्य होते? पतीला त्या बाबतींत कांहीं विचारणे म्हणजे त्याच्याविषयी आपल्या मनांत कांहीं संदेश उत्पन्न झाला आहे, अशी स्पष्ट कबुली देण्यासारखे होते. स्वतःच पतीविषयीं अविश्वास प्रकट करावयाचा? छीः!

परंतु किती झाले तरी सुनन्दा एक माणूसच होती. तिला मन, भावना म्हणून कांहीं होत्याच! विचारा-विचारानें तिला जेव्हां पराकाष्ठेचा ताप होई, मनाची शान्ति पार नष्ट होऊन त्याची तळमळ तळमळ सुरू होई, तेव्हां, योग्य संधि पाहून ती पतीला एवढेच विचारी,

"असं झालं आहे तरी काय अलीकडे आपणाला?"

श्रीकान्त भोळेपणाचा आव आणून उत्तर देई,

"काय झाल आहे? कांहीच नाही झालेलं मला बुवा!"

"कुणाला तरी खरं वाटेल हे?" सुनन्दा लडिवाळपणें म्हणे. "सांगावं ना गडे मला, खरोखर कांही जर होत नाहीं इकडे, तर अलिकडे दिवसेंदिवस असं कां बरं व्हायचं?"

भृकुटि वक्र करून, पण किंचित् हंसून, श्रीकान्त प्रतिप्रश्न करी,

"काय—झालं आहे तरी काय मला तुझ्या मतं? सांग ना तूंच! आपल्या मनचंच कांहीं तरी भूत उभं करायचं, अन् त्यालाच स्वतः भ्यायचं, असा चालला आहे तुझा प्रकार, नन्द! खरंच, काय आहे तुझी कल्पना?"

"काय जणं बाई!" असें म्हणून सुनन्दा निःश्वास सोडी.

" वेडी ! अगदीं पागल माझा नन्द !" असें म्हणून तिला जवळ ओढून श्रीकान्त हसून हळूच तिचे चुंबन घेई.

हिंदु स्त्रिया पागल खऱ्याच ! त्याची फसवणूक हा त्यां म्हणतां होते !

पतीच्या या कृतीने सुनन्दाचे सामधान होई. मनातल्या सर्व दुश्चिता आणि वाईट विचार ती बलपूर्वक काढून टाकी, आणि आपलीच कांहीं तरी गैरसमजूत झाली असली पाहिजे, अशी ती मनाची समजावणी करी.

आपल्या अशा देवाप्रमाणे सरलहृदय पतीविषयीं संदेह ? छेः छेः !

परंतु ज्या दिवशीं—किंवा रात्री—सुनन्दाला पतिराजांच्या तोंडाला मद्याची घाण आली, त्या दिवसापासूनच तिच्या मनांत रुजलेल्या संदेहबीजाचा वृक्ष हळूहळू चांगलाच फोफावू लागला !

त्या रात्रीं घरीं येताच, श्रीकान्ताने सुनन्दाचे चुंबन घ्यावयाला तोंड पुढे करतांच तिला चमत्कारिक घाण आली. तत्क्षणी तिच्या अंगावर कांटाच उभा राहिला ! कंपित स्वराने ती एकदम उद्गारली,

" छीः ! आपण आज दारू घेतली—"

त्या दिवशीं श्रीकान्ताचे मद्यपान अमळ जादा प्रमाणांत झालें असून नेहमींप्रमाणे विशेष सावधगिरी घ्यावयाचे भान त्याला राहिले नव्हते. मसाल्याच्या सुपारीने व्हिस्कीचा तीव्र गंध लोपला नव्हता !

आपण पकडलों गेलो, असे त्याला वाटले. परंतु अशा प्रसंगीं माणूस निर्लज्ज बनतो, त्याप्रमाणे बनून तो खिन्नपणे हसून म्हणाला,

" दारू ! छे छे ! दारूबिरू कांहीं नाहीं हं, नन्द ! नुसती बिअर आहे ही ! वाः ! बिअरला कुणी दारू का म्हणतं ? वेडी ! बिअर आहे ही, नुसती बिअर !"

सुनन्दा एकदम उसळून म्हणाली,

" डोंचकं माझं ! बिअर काय न् दारू काय, एकच ! कां, कां अशी अवदसा आठवली आपणाला ? कधीं कांहीं असले चाळे—"

श्रीकान्त मध्येंच म्हणाला,

" अग, खरंच, नन्द ! बिअर म्हणजे कांहीं दारू नव्हे ! अग पाणीच ते एक प्रकारचं ! "

" आहे ठाऊक मला ! पण पुन्हां नाहीं शिवणार अवदसेला, असं करावं कबूल—"

" कबूल करतों ग ! पण भलतंच डोक्यांत घेतां तुम्ही बायका ! त्यांत कांहीं दोष नाहीं— "

" नसूं द्या—गुण तर नाहीं ना ? सांगावं पण—नाहीं ना शिवणार पुन्हां ? "

जड स्वराने श्रीकान्त हंसून म्हणाला,

" नाहीं— "

सुनन्दाला काय वाटले कोण जाणे ! पांचदहा क्षण ती पतीच्या मुखाकडे मुकाट्याने पहात राहिली. नंतर अधिक कांहीं न बोलतां ती आपल्या बिछान्यावर जाऊन पडली, आणि तिने डोळे मिटून घेतले.

सुनन्दापाशीं श्रीकान्ताने मद्याला स्पर्श न करण्याचे कबूल केले खरें; परंतु एक दिवसहि त्याने आपले वचन पाळले नाहीं !

त्या दिवसाप्रमाणेंच दारूची घाण सोडीत तो दररोज घरीं येऊं लागला. सुनन्दा त्याच्यावर पुष्कळ रागावे, रुसे, चरफडे; त्याची नाना तऱ्हांनीं विनवणी—मनधरणी करी; चार चार दिवस अभिमानानें पतीशीं अबोला धरी. परंतु तिच्या कोणत्याहि कृतीचा श्रीकान्ताच्या मनावर तिळमात्रहि परिणाम झाला नाहीं ! तो आपला दररोज यावयाचा तसा दारू ढोसूनच घरीं येई !

बायकोने फारच ' त्रास ' दिला, तर एकाद्या वेळीं श्रीकान्तच उलट तिला रागवून म्हणे,

" पुरे पुरे ! काय उगीच चालवली आहेस बडबड तूं ! ऑफिसांत तसा त्रास, घरांत हा तुझा असा त्रास ! जगाव तरी कसं आतां माणसांनीं बुवा ! मेहेरबानी करून मला आतां मुकाट्यानं झोंपूं दे ना, नन्दा ! मला असा दररोज त्रास देण्यांत तुला आनंद तरी काय होतो, कळत

नाहीं मला ! जा, झोंप आतां ! उगीच हरदासासारखा उपदेशाचा मारा माझ्यावर न करतां मुकाट्यानं झोंप जा जाऊन ! तरी बरं, सिंधु कशी नवऱ्याचे अपराध पोटांत घालते, हें तूं पांचसात वेळां तरी पाहिलं आहेस ! ”

बिचारी सुनन्दा ! डोळ्यांतून पाणी काढीत मुलीला आपल्या व्याकुल हृदयाशीं घट्ट धरून मुकाट्याने अंथरुणावर पडे !

अंथरुणावर पडणे सोपे असे; परंतु झोप येणें सुनन्दाच्या हातचे नसे. अलिकडे रात्रीच्या रात्री तिच्या डोळ्याला डोळा लागल्यावांचून जात ! सुनन्दाचा ‘सोन्या’सारखा संसार बाहेरून जसा चालावयाचा तसाच चालला होता. त्यांत फारसा फरक पहाणाराला कोठेंच दिसून येण्यासारखा नव्हता. श्रीकान्त दररोज जावयाचा त्याप्रमाणे नोकरीवर जाई; सुनन्दा घरचें काम करी; देखरेख करी; छोटी मालू पूर्ववत् आनदानें खेळे बागडे—कशांतहि कांहीं बाह्यतः तरी फरक पडलेला दिसत नव्हता. परंतु सुनन्दाला पूर्णपणे कळून चुकले होते, कीं आपल्या संसाराला आंतून कोठे तरी अदृश्य अशी कीड लागली आहे! ती कीड हळुहळू, पण जोरानें त्याला पोखरीत असून, त्याचा पोकळ होत चाललेला डोलारा कधीं धाड्कन् कोसळेल, याचा नियम नाहीं! या एका जाणिवेने सुनन्दा अलिकडे अतिशय चिंतातुर आणि उद्विग्न होऊन गेली, तर त्यांत काय नवल आहे ?

श्रीकान्ताला अलीकडे घर मनापासून नकोसेच झाले होतें. बाहेर बाहेर रहाणेंच त्याला आवडे! तो घरीं येई तो अगदीं नाइलाजानें! त्याचीहि पूर्वीची हसरी खेळती मनोवृत्ति अलिकडे पूर्ण बदलली होती. अतिशय गंभीरपणें तो घरीं वागे——फारसा बोलतहि नसे. उगीचच्या उगीच बायकोवर चडफडे, रागावे, घरच्या जिन्नसांपानसांची आदळ-आपट करी !

पूर्वीं छोटी मालती म्हणजे श्रीकान्ताला अगदीं जीव कीं प्राण वाटायची! तिच्याशीं तो किती खेळाखिदळायचा! अलिकडे तो तिला प्रेमानें

हांकहि मारीत नसे; मग पूर्वीप्रमाणें तिला पाठीवर घेऊन 'भोपळा' म्हणून घरभर हिंडविण्याची किंवा तिच्याशीं चेंडूफेकीचा खेळ खेळावयाची गोष्ट कशाला! उलट, मालती आपण होऊन जवळ आली, तर तोच उठून दूर जाई, अगर तिला रागानें दूर करी! पोरगी रडली रुसली, तरी तो तिला जवळ घेत नसे.

पूर्वीं श्रीकान्त वाचनांत वगैरे निमग्न असला, तरी हजार वेळ मध्येंच उठून आंत जावयाचा, बायकोशीं बोलाचालावयाचा, तिची थट्टामस्करी करून तिला हंसवावयाचा, आपणहि पोटभर हसावयाचा! परतु आतां तें सारें नाहींसे झालें! आतां तो बहुधा घरीं नसेच; आणि असलाच, तर तो आपल्या खोलींत एकटाच दुर्मुखलेला चिंताक्रान्त बसून राही. सुनन्दा आपण होऊन तेथे आली, तर एकदम तो दचकल्यासारखा होई! कांहीं तरी तो आपणापासून लपवून ठेवण्याचा प्रयत्न करीत आहे, असा तिला स्पष्टपणें भास होई.

सुनन्दाला आतांपर्यंत पति म्हणजे परमेश्वर, त्याच्या हातून गैर असे कांहीं व्हायचेंच नाहीं, असे अन्तःकरणपूर्वक वाटे. परतु आतां हा तिचा विश्वास पार नाहींसा झाला. पतीच्या हातून कांहीं तरी दारुण पातक घडत असून, आपणाशीं तो प्रतारणा करीत आहे, असा दारुण संदेह सुनन्दाच्या मनांत उत्पन्न होऊन तो दिवसेंदिवस एकसारखा वृद्धिंगतच होत होता!

त्या दिवशीं सकाळींच श्रीकान्त कांहीं जरूरीच्या कामाकरतां बाहेर गेला होता. सुनन्दा शेगडीवर कुकर चढवून व्हरांड्यांत उभी होती.

इतक्यांत 'मॅनेजर'साहेबांच्या चपराशानें येऊन विचारलें,

" साहिब है ? "

सुनन्दानें त्याच्याकडे संशयाच्या दृष्टीनें आपादमस्तक पाहिलें, व कपाळावर एकदोन आंठ्या चढवून ती म्हणाली,

" घरमें नहीं है—"

" नहीं ? किधर गिया साहिब ? "

" मालूम नहीं—"

" कितना देर होगा ? "

सुनन्दा उगीचच चपराशावर रागवून म्हणाली,

" हम क्या साहेब है तुम्हारा ? कैसा बोल सकू ? "

बाईसाहेबाचे रागावणे चपराशाच्या लक्ष्यांतहि आले नसावे. तो जरासा घोटाळला. त्याने खिशांत एकदोन वेळ हात घातला, व नंतर एक लिफाफा खिशांतून काढून सुनन्दाच्या हातीं देऊन तो म्हणाला,

" साबकू दीजिये, माईजी ! बहूत जरूरीका है—भूलिये मत, माई ! "

'माईजी,' 'माई' या संबोधनानीं सुनन्दाहि जराशी नरमली. मस्तक हलवून तिने 'भूल' होणार नाही, असे त्याला आश्वासन दिलें.

चपराशी सलाम करून निघून गेला.

लिफाफा हातीं घेऊन सुनन्दा तशीच जागच्या जागीं बसून राहिली. त्या पत्रामुळे तिचे मन संशयाच्या हिंदोळ्यावर जोराने झोके घेऊ लागले.

लिफाफ्यावर नांव—पत्ता इंग्रजींत लिहिला होता. दुर्दैवाने सुनन्दाला इंग्रजी मुळीच येत नव्हते.

सुनन्दाने आपणाशी कर——कर विचार केला, आणि मनाशीं कांही निश्चय करून तिने तो लिफाफा हळूच फोडला, व आंतून एक सुगंधी, गुलाबी कागद बाहेर काढला. परंतु त्यावर इंग्रजींतच मजकूर लिहिला आहे, असे तिला आढळून आले.

पतिराजांच्या बॅंकेचा मुख्य मॅनेजर युरोपियन आहे, हे सुनन्दाला ठाऊक होतें. त्यामुळे, ते इंग्रजींत लिहिलेले पत्र पाहून, कदाचित् पत्र मॅनेजरसाहेबाचे असेलहि, असें तिला वाटले. परतु लगेच तिच्या मनांत अशी कल्पना आली, कीं दहा वाजता ऑफिसांत पतिराजांची आणि मॅनेजरची भेट होतच असते. मग मॅनेजर बहुधा सकाळीच त्यांना चिठी पाठवितो, याचा अर्थ काय ?

छेः ! पतिराज सांगतात त्याप्रमाणें बँकेच्या मॅनेजरसाहेबांकडून या चिठ्ठया येत नसल्या पाहिजेत. ते आपली प्रतारणा करताहेत हें खास !

तर मग पत्रें कुणाचीं ? कोण पाठवितो ? कां ?

सुनन्दाचें मन पुनरपि संशयाच्या हिंदोळ्यावर जोरानें हेलकावे खाऊं लागले.

चपराशाची तरी चांचणी घ्यावी, असें तिला एक वेळ वाटलें.

पण तो केव्हांच दिसेनासा झाला होता !

सुनन्दाच्या मनाला अतिशय चुटपुट लागून राहिली. हातांतल्या इंग्रजी पत्रामुळे तिचे चित्त अत्यंत उत्कंठित आणि उद्विग्न झालें होते. हातीं पत्र सांपडले आहे, तों प्रकरणाचा सोक्षमोक्ष काय तो लावून घ्यावा, या हेतूनें तिला उत्कट उत्कंठा लागली होती; तर त्या सोक्षमोक्षाचा परिणाम काय होईल, कांहीं भलतेसलतेच तर आपणाला कळून येणार नाहीं ना, या आशंकेने तिचे मन भयभीतहि होऊन गेले होते.

इतक्यांत सुनन्दाची नजर समोर गेली. शेजारघरचा मनोहर रस्त्यानें कोठेसा चालला होता, तो तिच्या दृष्टीला पडला.

सुनन्दाच्या मनांत चटकन् कांहीं कल्पना आली, आणि तिनें हळूच हांक मारली,

" मनु, मनु, ए मनोहर ! "

मनोहर हा शेजारच्या बंगल्यांतील शंकरराव नामजोशांचा मुलगा. हायस्कूलमध्ये तो सहाव्या इयत्तेत होता. अभ्यासांत तो जसा हुषार, त्याप्रमाणेच स्वभावानेही नम्र आणि उपकारी होता. नामजोशांचा आणि मुजुमदारांचा स्नेहसंबंध विशेष असून मनोहराची आई पार्वतीबाई यांना सुनन्दा 'मावशी' म्हणे; आणि त्याच नात्यानें मनोहर तिला 'ताई' म्हणून हांक मारी.

मनोहरने सुनन्दाची हांक ऐकली. चटकन् वळून त्याने विचारले,

" मला हाक मारलीस, ताई ? "

" होय, मनु ! ये, जरा काम आहे—"

व्हरांड्याच्या पायऱ्यांशीं येऊन मनोहर ताईकडे जिज्ञासेच्या दृष्टीनें पहात राहिला.

किंचित् स्मित करून सुनन्दा त्याला म्हणाली,

" कुठं जात होतास वाटतं ? कांहीं काम का आहे जरूरीचं ? "

मान हलवून मनोहर म्हणाला,

" नाहीं—तसं महत्त्वाचं कांहीं काम नाहीं विशेष—त्या पलिकडल्या नाक्याजवळ माझ्या वर्गातला एक मित्र रहातो. तापानं बराच आजारी होता तो—आतां बरं वाटतं आहे त्याला आज पांचसहा दिवस. त्याच्याकडे जाऊन येणार होतो, शाळेत कधीं येणार आहे तो ते विचारून—म्हणाला होता म्हणून—"

जरा आंवढा गिळल्यासारखे करून सुनन्दा म्हणाली,

" माझं एक काम करतोस, मनु ? तसं म्हणजे—मी—"

'ताई' अडखळलेली पाहून मनोहरला वाटले, कीं कांहीं जिन्नस-पान्नस आणून द्यायला तिला हवा आहे; पण सांगायला ती संकोच करते आहे ! तो किंचित् हंसून म्हणाला,

" कसलं काम, ताई ? सांग ना—त्याला एवढ हे कशाला ? काय आणायच आहे ? आता देतो आणून ! लेजेजुस मालीला ?—"

दोनतीन दिवसांपूर्वी सुनन्दाने मनोहरकडून मालतीकरतां लेजेजुस आणविले होते. ते संपले असून पुनः तिला ते आणवायचे असतील, अशी मनोहरची सहजच कल्पना झाली.

सुनन्दा हंसली, व म्हणाली,

" नाहीं रे मनु ! आणूनबिणून द्यायच नाहीं आहे—"

" मग कसलं काम ? " मनोहराने कुतूहलाने प्रश्न केला.

" वर ये—मग सांगत्ये. "

मनोहर झटपट पायऱ्या चढून व्हरांड्यांत आला. त्याला घेऊन सुनन्दा आंत दिवाणखान्यांत आली.

इकडे तिकडे पाहून मनोहरच्या हातीं ते पत्र देऊन सुनन्दा म्हणाली,

" इंग्रजींतल पत्र तुला नीट समजेल ना रे, मनु ? "

मस्तक हलवून मनोहर म्हणाला,

" हो, समजेल तर काय झाल ! पण अक्षर अगदींच गिचमिड असेल तर पचाईत !"

नंतर तो हातांतल्या पत्राकडे पाहून स्मितपूर्वक उद्गारला,

" नाहीं, तस बरं आहे अक्षर. लागेल—पण लेडी-हँड आहे—"

" म्हणजे काय ?"

" बायकांच्या अक्षरासारखं अक्षर आहे या पत्राच. बाकी, पुष्कळ पुरुषदिखील बायकांसारखंच लेडी-हॅडनं लिहितात म्हणा!—" असे म्हणून तो हंसला.

भृकुटि वक्र करून सुनन्दा म्हणाली,

" असं ? बरं पण, हे पत्र वाचून यात काय लिहिलं आहे त्याचा अर्थ मला सांगता येईल तुला ?"

ताईच्या या अज्ञानमूलक प्रश्नाने मनोहरला हंसू आल्यावांचून राहिले नाहीं. हंसत हसत तो म्हणाला,

" आतां काय सांगाव ताई, तुला ? असल्या साध्या पत्राचं भाषान्तर मला नाहीं करतां आलं म्हणजे झालच ! अग, दर आठवड्याला सात-आठ कठीण कठीण इग्रजी उताऱ्याच भाषान्तर करून न्यावं लागतं आम्हांला, समजलीस ? या फुसक्या पत्राची काय एवढी पत्रास ?"

सुनन्दा बंधुराजांकडे पाहून कौतुकाने किंचित् हसली, व म्हणाली,

" खरच रे मनू ? मला रे काय ठाऊक हे बाबा ! बर, पत्र वाच, अन् मला त्याचा अर्थ सांग बरं करून—"

मनोहरने मनांतल्या मनांत ते सर्व पत्र वाचले, व खालीं पहात तसाच तो बसून राहिला.

सुनन्दाला ते अंमळ चमत्कारिक वाटलें. तिनें विचारले,

" हे रे काय, मनू ? सांगतोस ना मला त्याच मराठी भाषान्तर करून ?"

मनोहरने एकवार ताईकडे पाहिलें, आणि किंचित् हसून त्याने पुनः खालीं मान घातली.

सुनन्दाला त्याची ही कृति अर्थातूच चमत्कारिक आणि गूढ वाटली;

आणि कोण जाणे कां ते, तिचें काळीजही किंचित् थरारले. क्षणभरानें तिने त्याला पुनः विचारले,

" कां रे, मनू ? सांग ना मला काय आहे ते त्या पत्रांत—–"

मनोहरने वर मान केली, आणि संकोचाच्या मृदु स्वराने तो म्हणाला,

" अगदीं वा–वाईट आहे हे पत्र, ताई!"

सुनन्दा आश्चर्याने म्हणाली,

" वाईट ! म्हणजे काय, मनू ? कसलं आहे तें पत्र ?"

" हे एक प्रेमपत्र आहे, ताई!" असे म्हणून मनोहर खालीं पाहू लागला.

सुनन्दाच्या हृदयात कसल्या तरी तीव्र शस्त्राची धार खालींवर झाली. कंपित स्वराने तिने विचारले,

" अस ? काय आहे पण त्या पत्रांत ?"

" प्रेमाबिमाच्या पुष्कळ गोष्टी लिहिलेल्या आहेत पत्रांत या. म्हणजे, नाटक-कादंबऱ्यांतून प्रेमाबिमाच्या गोष्टी असतात ना, तशापैकींच कांहीं प्रकार—"

सुनन्दाचा चेहरा हे ऐकून राखेप्रमाणे झाला ! कांहीं क्षणांनीं तिने विचारले,

" पण कुणी लिहिल आहे हे पत्र, मनू ? खाली सही कुणाची आहे ?"

पत्राच्या खालच्या सहीकडे नजर टाकून मनोहर म्हणाला,

" एका मेमन लिहिलेलं दिसत आहे हे, ताई ! 'फ्लोरा' एवढीच सही आहे पत्राखाली, तेव्हा पत्र तिनच लिहिल आहे. पण तिन ते कुणाला उद्देशून लिहिल आहे, हे काही पत्रावरून कळत नाहीं. फक्त 'डार्लिंग' एवढाच शब्द प्रारंभी लिहिला आहे त्या बाईन. 'डार्लिंग' म्हणजे 'प्रियकर'. पण हे पत्र तुला मिळालं तरी कुठं, ताई ?"

मनोहराचा हा प्रश्न सरळ, पण फार बिकटीचा होता. त्याला काय उत्तर द्यावे, हे सुनन्दाला एकदम सुचेना. परतु चारदोन क्षण थाबून ती दुसरीकडे पहात म्हणाली,

" माल्र्ला सांपडलं वाटतं कुठंस. तिनं आणून दिलं माझ्याजवळ– तेव्हां आपलं—"

मनोहराने मध्येंच विचारले,

" पण हे पत्र पाकिटांतून आलेलं दिसतं. उघड नाहीं असलं पत्र यायच. माल्नं पाकीट नाहीं आणलं? आणलं असतं, तर कोणत्या साहे-बाला त्या फ्लोरान हे प्रेमपत्र लिहिलं आहे, तें कळलं असतं आपणांला—"

सुनन्दा एकदम चमकली, आणि तिच्या हृदयांत कसेसेच झालें! तिला वाटलें, आपणाला सुदैवानें काय बुद्धि सुचली, आणि आपण मनोहराच्या हातीं पत्राचा लिफाफा दिला नाहीं! नाहीं तर फजितीला पारावार नव्हता!

नोटपेपर ( कागद ) मनोहराच्या हातून घेऊन सुनन्दा जड कंठानें म्हणाली,

" नाहीं रे! नुसतं पत्रच सांपडलं पोरीला! बरं, एवढंच माझं काम होत, जा तू आतां! उगीच तुला उशीर नको—"

ताईचा असा किंचित् बाप्पजड शब्द ऐकून आणि तिच्या चेहऱ्या-कडे पाहून मनोहराला अतिशय आश्चर्य वाटू लागले. तिचा चेहरा एका-एकीं असा भकास आणि फिक्कट का झाला? तिला वाईट वाटावे असे फ्लोराच्या या पत्रांत काय आहे?

सहानुभूतीच्या मृदु स्वराने मनोहरने विचारलें,

" ताई, आज तुला कांहीं होतं बितं का आहे? तुझा चेहरा असा एकदम उतरला कां?"

सुनन्दा बलपूर्वक किंचित् हंसली, आणि आंवढा गिळून म्हणाली,

" छे रे, मनू! कांहीं झाल नाहीं मला! उगीच तुला आपलं वाटल झालं कांही तरी! रात्रीं जागरण झालं होतं थोडं, त्यानं दिसत असेन थोडीशी ही! बरं, हे वाजायला आले नऊ—तुझी जेवायची वेळ होईल, तूं आपला जा आतां—"

मनोहरला ताईचे ते स्पष्टीकरण कितपत पटलें कोण जाणे! पण तो आपला आपणाशींच कांहींसा आश्चर्य करीत हळुहळू निघून गेला.

पत्र हातीं घेऊन सुनन्दा एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणे जागच्या जागीं बसून राहिली. पत्राने तिच्या अन्तःकरणांत स्वच्छ प्रकाश पाडला होता!

आतांपर्यंत संशयाच्या अंधारांत ती चांचपडत होती. परंतु आतां तिला सर्व कांही स्पष्ट आणि स्वच्छ दिसूं लागले. पतिराजांची आतापर्यंतची प्रत्येक लहानमोठी कृति, व्यवहार आणि चालचलणूक यांचे रहस्य आतां सुनन्दाच्या चांगलेच ध्यानांत आले.

तिच्या मनांत विचार-विकारांचा भयंकर कल्लोळ उसळला !

सगळ्या विचाराचे, कल्पनाचे, भावनाचें तात्पर्य एक आणि एकच होतें ! ;पतिराजांचे आपणावर जे प्रेम होते, ते पूर्ण नष्ट झाले असून, ते एका इंग्रज तरुणीवर जडले आहे !

तरुणी ? कशावरून ?

ही फ्लोरा तरुण तर आहेच आहे; पण आपणापेक्षा ती किती तरी पटीने सुदरही असली पाहिजे ! नाही तर आपल्या पतिराजाचे प्रेम आपणावरून ढळून तिच्यावर कसे जडेल ? आपणही तारुण्यांतच आहो— कांहीं जख्ख म्हाताऱ्या झालेल्या नाहीं, हे खरे; परतु आपणाला परमेश्वरानें सुंदर रूप कुठे दिले आहे ? आणि वर्ण दिला आहे तो हा असा काळासांवळा ! 'फ्लोरा' हे नावच सागते, कीं ती तरुण, सुदर आणि रगाने गोरीभुरकी असलीच पाहिजे ! तुलनेने प्रत्येक बाबतींत आपण हीन आहो ! मग या फ्लोरावर पतिराजाचे प्रेम जडले, तर काय नवल आहे ?

पुरुष हे बरे——पुरुष !

आपल्या हातून असे कांही झाले असते, तर पतिराजानीं कसे आकाशपाताळ एक करून सोडले असते ! आपणाला ससारात क्षणभर तरी आश्रय मिळाला असता का मग ?

शिवशिव ! या चांडाळीण फ्लोराने आपल्या पतिराजाचे मन भुलवून त्यांना आपणाकडे ओढून घेतले आहे ! आपल्या सोन्यासारख्या संसाराला या गोऱ्या कवटाळणीने चुडीने आग लावून दिली आहे ! गेला सारा संसार !—सारे प्रेम !—सगळे विश्वजगत् !

सुनन्दाच्या अगाची सन्तापानें नुसती कहाली होऊ लागली. तिला

वाटूं लागलें, जर कधीं ही कवटाळीण आपल्या दृष्टीला पडली, तर वाघिणीप्रमाणें तिचे नरडें फोडून आपण तिचें ऊन ऊन रक्त पिऊं—

कांहीं वेळ सुनन्दा तशीच निश्चल बसून होती. नंतर ती आपल्या कामाला लागली.

* * *

नेहमींप्रमाणे भोजन झाल्यावर श्रीकान्त ऑफिसांत जावयाला निघाला.

नेहमींप्रमाणे सुनन्दाहि दिवाणखान्यांत आली, व येतांच ती गंभीरपणे म्हणाली,

" आपल एक पत्र आहे. "

" पत्र ? कुणाचं ? पोस्टानं आलं ?"

" नाहीं—सकाळी चपराशानं आणून दिलं—"

श्रीकान्त अगदीं अधीर झाला. हात पुढे करून तो म्हणाला,

" दे दे दे ते—कुठ आहे, पाहूं—"

सुनन्दाने पोटकुळीं लावलेले ते पत्र पतीच्या हातीं दिलें, आणि ती गभीरपणे तेथेच उभी राहिली.

पत्राकडे एक वेळ पाहून, नतर पत्नीकडे पहात श्रीकान्त पराकाष्ठेच्या आश्चर्याने म्हणाला,

" हे काय ? कव्हर फोडून कुणीं बाहेर काढल हे ?"

श्रीकान्ताकडे तीव्रपणे पहात सुनन्दा म्हणाली,

" मी——मी फोडलं—"

भुवया वांकवून श्रीकान्तानें तीव्र स्वरानें विचारलें,

" तूं ? एवढी काय जरूरी पडली होती तुला ?"

ओठ चावून सुनन्दा म्हणाली,

" एवढं अगदीं रागावूनस विचारणं ? मीं फोडलं तर झालं काय ? माझा कांहींच अधिकार नाहीं संसारांत ?"

इतक्यांत श्रीकान्ताच्या ध्यानांत आलें; कीं पत्र आहे इंग्रजींत ! त्याने एक सुटकेचा निःश्वास टाकला. आपली इच्छा असतांहि सुनन्दा

इंग्रजी शिकली नाहीं, याबद्दल त्यानें आपल्या सासूसासऱ्यांना आणि सुनन्दालाहि अनेक धन्यवाद दिले!

शुष्कपणें हंसून तो म्हणाला,

" नाहीं नाहीं—असं उगीच रागवायला काय झालं? संसारांत तुमचा अधिकार नाहीं असं कोण म्हणेल? तुम्ही तर आमच्या अर्धांगी! माझ्या सर्वस्वाचा अर्धा अधिकार तर तुमचा—अगदीं धर्मशास्त्राच्या न् कायद्याच्याहि दृष्टीनं!"

" पुरे! उगीच स्तुति नको! आमचा इतका अधिकार असता, तर असं कां झालं असतं? आम्ही दासी–मोलकरणी–बंद्या गुलाम–पायांची धूळ—पुरुषांच्या!"

श्रीकान्त जरा चमकल्यासारखा झाला. मृदु स्वरानें तो म्हणाला,

" उगीच कशावरून कुठपर्यंत नेतेस प्रकरण, ते तूंच पहा! तुला इंग्रजी येत नाहीं, मग उगीचच पत्र फोडलस कां, एवढं मीं तुला सहज विचारलं, तर त्याचा एवढा फोपाटा केलास!"

सुनन्दा कांहींच बोलली नाहीं; बाहेर पहात मुकाट्यानें उभी राहिली. श्रीकान्ताचेहि सारे अवधान आतां आपल्या 'प्रेयसी'च्या मधुमधुर पत्राकडे असल्यामुळे त्यानेहि आतां 'अर्धांगी'कडे अधिक लक्ष दिले नाहीं. घाईघाईने, एका सपाट्यासरसें त्याने ते पत्र वाचून टाकले.

पत्र वाचीत असतां श्रीकान्ताच्या चेहऱ्यावर प्रसन्नतेच्या आणि हर्षस्मिताच्या लहरी खेळत असून क्षणोक्षणीं त्यांचा जोर वाढत होता!

सुनन्दाचे सर्व लक्ष पतीच्या चेहऱ्याकडे होते. त्यावर उमटणाऱ्या हर्षानंदाच्या ऊर्मि पाहून तिच्या हृदयाची आगीआग होऊं लागली, त त्यांत कांहींच नवल नव्हते!

पत्र वाचून होतांच श्रीकान्ताने तें खिशांत ठेवून दिलें.

सुनन्दाने त्याच्याकडे तीव्र दृष्टीने पहात कठोर स्वरानें विचारले,

" कुणाचं पत्र?"

" उं:—आहे असंच आपलं—हं—झाल—तें म्हणजे—"

अधिकच तीव्र स्वरानें सुनन्दानें पुनः प्रश्न केला,

" काय लिहिलं आहे मेमसाहेबांनीं पत्रांत ? "

श्रीकान्त पत्नीच्या या प्रश्नाने दचकला. परंतु शक्य तितक्या त्वरेनें तो भाव लपविण्याचा प्रयत्न करीत, तिच्या मुखाकडे तीक्ष्ण दृष्टीने पहात तो उद्गारला,

" मेमसाहेब ! म्हणजे काय ? कोण मेमसाहेब ? "

सुनन्दाचे हृदय अगदी भरून आले असून, तिला अगदीं रडूं कोसळण्याच्या बेतांत होते. परतु ते तिने महत्प्रयासांनीं आंवरले, आणि तीक्ष्ण स्वराने ती म्हणाली,

" मेमसाहेब कोण ? हः ! उलट मलाच विचारतां ? मनाला कांहीं—"

श्रीकान्ताला तिचा तो उद्गार चमत्कारिक वाटला. त्याने विचारलें,

" म्हणजे काय ? "

" म्हणजे काय ? वाः ! " सुनन्दा गर्जना करून म्हणाली. " छानछान चाललं आहे नाटक ! अगदीं त्या गांवचंच नसायच अ ? मेमसाहेब कोण ? कां—तुमची ती गोऱ्या कातड्याची, पण काळ्याकुट्ट मनाची सुदरी फ्लोरा ! "

श्रीकान्त एकदम दचकून उद्गारला,

" फ्लोरा ! "

दांतओठ खाऊन पतिराजांकडे कठोर दृष्टीने पहात सुनन्दा म्हणाली,

" होय—तीच चाडाळीण फ्लोरा ! जिच्याशीं विलास करण्यांत प्रहऱ्या प्रहर खर्च होत असल्यामुळ तुम्हाला दररोज घरी यायला इतकी रात्र होते ! जिच्यासाठीं तुम्हाला तहानभूकहि सुचेनाशी होते ! तीच ती राक्षशीण फ्लोरा ! आता उगीच भोळेपणाचा लपडाव कशाला ? आजवर झालीं तीं नाटक पुरे झालीं. आतां उघड उघड प्रेमाचे तमाशे चालूं द्यात अगदीं—अगदीं उजळ माथ्यान ! "

निरभ्र आकाशांतून मस्तकावर एकदम वज्राघात व्हावा, तसे श्रीकान्ताला झालें !

परतु तो पांच दहा क्षणांतच सांवरला. बोलूनचालून तो 'आर्य पुरुष' होता ! त्याचें 'आर्यत्व' आणि 'पुरुषत्व'हीं अत्यल्प अवकाशांत पूर्णपणे

जागृत झाली. त्याच्या चेहऱ्यावर क्षणापूर्वींचा घाबरटपणा आणि संकोच तत्काल नाहींसा झाला, आणि तेथें कठोरता स्पष्टपणे दिसूं लागली.

कपाळाला आंठ्या घालून आणि भृकुटिभग करून श्रीकान्त म्हणाला,

" तुझी तशी इच्छा असेल, तर यापुढ तस होईल! अगदीं उघडपण काय करायच ते करूं आम्ही! तुझ्यासारख्या दीडदमडीच्या बटकीला भितों का काय मी? मी माझ्या ससाराचा मालक आहें—कुणा—कुणाची हुकमत माझ्यावर मी चालूं द्यायचा नाहीं. माझ्या मर्जीला लागेल तस मी करणार!"

असें म्हणून आपल्या या वक्तृत्वाचा परिणाम आपल्या पत्नीवर काय झाला, याचें तो निरीक्षण करूं लागला.

परतु सुनन्दा कांहीं न करतां, दोन्ही हातांनीं तोंड झांकून हुदके देत जागच्या जागीं उभी होती.

चार दोन क्षणांनीं श्रीकान्तानेंच कठोर स्वरानें प्रश्न केला,

" दुसऱ्याचीं पत्रं फोडून वाचणं हा फौजदारी गुन्हा आहे—कुणाकडून वाचवलंस माझ पत्र? निर्लज्ज!—"

परंतु सुनन्दा कांहींच बोलली नाहीं. फुलूनफुलून ती एकसारखी रडत होती. तिच्या गालांवरून अश्रुप्रवाह खालीं ठिबकत होता.

" असं नुसतं रडत बसलं म्हणजे झालं!" श्रीकान्त पुनः कडाडला.

सुनन्दा एकदम खालीं वांकली, आणि पतीचे पाय धरून स्फुंदत स्फुंदत म्हणाली,

" असा कां बरं माझा छळ करायचा? माझ्या हातून असा आपला अपराध तरी काय झाला? मला अशा यमयातना देण्यासाठींच का माझ्याशीं लगीन करून मला घरीं आणलं? लग्नांत घेतलेल्या आणाशपथा तरी मनांत बाळगायच्या होत्या—"

असें म्हणून सुनन्दानें वर मान करून पतिराजांच्या मुखाकडे पाहिले. परंतु श्रीकान्त खांबाप्रमाणे जागच्या जागीं स्तब्ध उभा होता!

क्षणभरानें सुनन्दाच बोलूं लागली,

" माझं रूप वाईट आहे—रंगानं मी काळी आहें, हें सगळं मी

कबूल करत्यें. त्यामुळं आपणाला मी आवडत नसेन, हेंहि मला आतां स्पष्ट दिसतं आहे. पण म्हणून, इतक्या दिवसांची सगत विसरून कशी जायची एकदम ? बरं, माझ मेलीचं एक असो ! द्यायचं मला लाथाडून— पण आपली गुणांची मालू ! तिचा तर बिचारीचा कांहीं अपराध नाहीं ना ? मालू तर आपल्याच मनाचा, आत्म्याचा अन् देहाचा अंश ! पोरी-कडे दिखील का अगदीं पहायच नाहीं ? इतके कठोर, इतके निष्ठुर आम्हांवर कसे हो झालां ? ”

कांहीं झाले तरी श्रीकान्त माणूसच होता. अनिवार मोहजलांत तो गुरफटून गेला असला, तरी त्याची मनोवृत्ति मूळची अभिजातच होती. धर्मपत्नीच्या या करुण आक्रोशानें त्याचेंहि मन थोडेबहुत द्रवल्याशिवाय राहिले नाहीं.

पांच सात क्षण स्तब्ध राहून श्रीकान्त कांहींशा मृदु स्वरानें म्हणाला,

“ हे पहा—झालं, होऊन गेल, त्याला कांही उपाय नाहीं. आपणांपैकीं प्रत्येकाच्या कर्मफळाचा तो दोष समजू या—”

सुनन्दा मध्येच रडत म्हणाली,

“ असं कसं बर म्हणायच ?—”

तिला थांबवून श्रीकान्त पुढे बोलू लागला,

“ थांब—माझं अगोदर ऐकून घे सार. एवींतेवीं तुला सारं कळून चुकलंच आहे. तेव्हां तुला स्पष्टच सार सांगायला कांहीं हरकत नाहीं. मी बाहेर काय करतों, याच्याकडे खर म्हटल तर तुला लक्ष द्यायचं मुळीच कारण नाही. मीं कांहीं केलं, वाटेल तसा बाहेर वागलों, तरी तुला तर कांही मी कसले कष्ट देत नाही ना, नन्दा ? पूर्वीप्रमाणच तुम्हां दोघांशीं माझ प्रेमाच वर्तन आहे. पूर्वीप्रमाणंच ससारात हवं नको सगळं कांहीं मी पहातो आहे. कोणत्याहि प्रकारची कमतरता किंवा उणीव तुम्हांला मी पडू देत नाहीं. मग कां उगीच रागरुसवा अन् रडणंस्फुंदणं करून माझ्या सुखाच्या मार्गांत तू कांटे पसरतेस ? ”

पतिराजांचें हें भाषण सुनन्दाच्या कानांना तप्त तेलासारखें वाटलें ! मनुष्य घसरला, तरी त्याची इतकी नीच प्रवृत्ति होईल, अशी तिची

कल्पना नव्हती. पतीचा तिला आतां अत्यंत तिटकारा वाटूं लागला.

अश्रुपूरित, पण तीव्र दृष्टीने श्रीकान्ताकडे पहात सुनन्दा म्हणाली,

" काय म्हणायचं तरी हे ? पूर्वीप्रमाण आपण घरससारांत वागायला होतं आहे, अस छातीला हात लावून सांगतां येईल आपणाला ? आतां एवढं मात्र खर, कीं खायचे-प्यायचे कष्ट अजून तरी सुदैवान आम्हांला होत नाहीत. पण खाणंपिणं म्हणजेच का माणसाच सर्वस्व ? "

परंतु श्रीकान्त कांहीं उत्तर न देतां स्तब्धपणे उभाच होता.

" नुसतं बायकोला दोन वेळ सुग्रास अन्न घातलं, अन तिला नेसापांघरायला चांगलीं वस्त्रप्रावरण दिली, म्हणजे तिचा सुखाचा ससार होतो का ? एवढ्यासाठीं का माझ्याशीं लगीन केलं आपण ! एवढ तर माझ्या आईबापांनीही मला जन्मभर अगदीं पुरं दिल असतं ! "

तरीहि श्रीकान्त स्तब्धच होता.

क्षणभर थांबून सुनन्दाने पुनः पतिराजाचे पाय धरले, व ती म्हणाली,

" इकडच्या मी पायां पडत्ये हो ! माझी कांहीं चूक, अपराध असला, तर मला माफी करावी. खरंच, हे सगळं सोडून द्याव, अन् पूर्वीसारखं पुन्हां व्हावं—— "

श्रीकान्तानें तिला वर उठविलें, आणि तो मृदु स्वराने म्हणाला,

" बरं——ठीक आहे. त्याबद्दल आतांच वादविवाद नको अगोदर मला ऑफिसला जाऊ दे—— "

असें म्हणून तो निघूनहि गेला.

## सात .... .... .... .... .... चकमक !

एका दृष्टीने झाले ते बरेच झाले, असे श्रीकान्ताला वाटले. त्याचें प्रेमरहस्य सुनन्दासमोर उघडे पडल्यामुळे त्याची वाट आतां निष्कंटक झाली ! बायकोविषयीं जो लज्जासंकोच त्याला वाटत असे, तो आतां वाटेनासा झाला.

'एकलज्जां परित्यज्य' म्हणतात तें खरें आहे ! फ्लोराच्या नवनवीन प्रेममधूचा आस्वाद घेण्याकरतां श्रीकान्त आतां सुनन्दासमक्ष, तिची यत्किंचित्‌ही परवा न करतां, तिच्याकडे धांवत जाई !

आतां त्याच्या वर्तनाला कांहीं धरबंध म्हणून राहिला नव्हता ! मनाला वाटेल तेव्हां तो फ्लोराकडे जाई, आणि मर्जी लागेल तेव्हां घरीं परत येई.

बिचारी सुनन्दा ! एक निर्बल हिंदु स्त्री ! तिच्या हातीं रडण्यावांचून काय होते ? आपल्या प्राक्तनाला दोष देत ती अशरणतेने खूब रडे. सतीला पतीच्या प्रेमावांचून जगांत काय प्रिय आहे ? त्याच प्रेम-निधानाचा पूर्ण लोप होऊन आपला पति दुसऱ्या स्त्रीच्या ठिकाणीं आसक्त झालेला पहाणे यासारखी अपमानाची, दुःखाची, एकहि गोष्ट नसेल ! पण आता तीच सुनन्दाच्या नशिबीं भोगणे आले होते.

श्रीकान्तासमोर ती पुष्कळ रडरड रडली. अंगावर केरोसीन ओतून, जाळून घेऊन आत्महत्त्या करण्याची भीतिहि तिनें त्याला दाखविली. परंतु कशानेहि कांहीं झालें नाहीं ! श्रीकान्ताला अधोमार्गा-पासून ती केंसभरहि परत फिरवूं शकली नाहीं.

पतीला फ्लोरापासून परत मिळविण्यासाठीं सुनन्दाने एक एक युक्ति योजून पाहिली. परंतु एकूण एक शस्त्रें विफल झाली, असाच तिला अनुभव आल्यामुळे ती हताश झाली, आणि 'आलिया भोगासी असावे सादर' या न्यायानें तिने शेवटीं शान्त भाव धारण केला. मधुनमधून

आत्महत्त्या करून या भयंकर यमयातनांतून मोकळें व्हावे, असा विचार उत्कटतेनें तिच्या मनांत येई. परंतु निरपराध मालतीच्या मुखाकडे पाहून तितका वेळ तिला आपले मन आवरावे लागे. आपल्यामागें त्या अनाथ अजाण अर्भकाची काय स्थिति होईल, याचे अत्यत भीषण चित्र तिच्या मानसनेत्रांसमोर उभें राही, आणि आत्महत्त्येचा विचार ती मागें टाकी. निद्रित ज्वालामुखी पर्वताप्रमाणे आंतल्या आंत जळत धुमसत सुनन्दा संसारांत पडून राहिली होती. मालूचे मधुर मुखचुंबन, एवढें एकच एक आनंदाचें साधन आतां बिचारीला राहिले होते !

  

आज थोडे दिवस झाले, मालू तापानें आजारी पडली होती.

पोरीला घरगुती उपाय सुरू होते; पण गुण पडे ना ! सुनन्दाला मुलीसाठीं डॉक्टर आणणे शक्य झाले नाहीं. कारण,—कारण सांगितले, तर वाचकांना ते असत्य वाटेल—डॉक्टरची 'फी' द्यावयाला तिच्यापाशीं पैसाच नव्हता !

दूध आणि बार्ली यांवरच सुनन्दाने मुलीला आजपर्यंत ठेवले होते. परतु मालूनें आज 'बंड' केले ! हे दोन पदार्थ आपण साफ घेणार नाहीं, असे तिने आईला निक्षून सांगितले.

"मला गडे मोसबीं न् द्राक्षं आण ना ग आई !" असा ती हट्ट धरून बसली होती.

परतु हीं फळें आणायचीं कशीं ? घरांत तर एकहि पैसा नव्हता !

श्रीकान्त आरामखुर्चीवर पडून एक इग्रजी कादंबरी वाचण्यांत अगदीं रगून गेला होता. लॉरेन्सची ती कांदबरी असून आदल्याच दिवशीं फ्लोराने ती त्याला मुद्दाम शिफारशीने वाचायला दिली होती.

होतां होईल तो सुनन्दा अलीकडे पतीसमोर येतच नसे. 'दृष्टीआड सृष्टीआड' अशी ती मनाची समजूत करून घेई. अगदीं नाइलाज झाला, म्हणजेच ती श्रीकान्तासमोर येई, किंवा बोले.

आतां सुनन्दा मुद्दामच श्रीकान्ताच्या खुर्चीसमोर येऊन उभी राहिली.

पहिल्याने ती काहीं बोलली नाहीं. श्रीकान्तच आपणाशीं बोलेल, असे तिला वाटले होते.

परंतु तो कांहींच बोलला नाहीं, किंवा पुस्तकावरून त्यानें नजरहि चळविली नाहीं. तेव्हां मिनिटभर वाट पाहून सुनन्दानेच बोलायला सुरवात केली,

" ऐकल ? "

वर न पहातांच श्रीकान्त म्हणाला,

" हु—"

" पोरीला ताप येऊन आज तीन दिवस झाले. तरी पण अजून ताप कांहीं काढत नाहीं. मग आता पुढ ? "

श्रीकान्त कांही बोलला नाहीं, कीं त्याने पुस्तकावरून दृष्टि काढली नाहीं.

जरा जोरानेच सुनन्दा म्हणाली,

" मग आतां करायचं काय ? पोरगी आतां दूधहि घेईनाशी झाली——"

श्रीकान्त नुसता उद्गारला,

" अस ! "

" नुसत 'अस' म्हणुन कस चालणार ? " सुनन्दा तीव्र स्वराने म्हणाली.

" मग काय करू मी ? "

" कांहींच नाहीं ना करण्यासारख ? शेवटीं पोरगी औषधपाण्यावांचून तडफडत जाणार का ? काहीच कस नाहीं वाटत इकडच्या मनाला ? "

" तू सागशील ते करायला मी तयार आहे. बोल, काय करू ? "

" एकादा चांगला डॉक्टर आणायला हवा, अन् फळांवर माळूची इच्छा गेली आहे, तीहि थोडीं विकत घेऊन यायला हवींत—"

श्रीकान्त शान्तपणे म्हणाला,

" ठीक आहे—"

परंतु त्याने पुस्तक कांहीं सोडलें नाहीं, किंवा पत्नीकडे बघितलेंहि नाहीं.

सुनन्दा आतां खूब चिडली. कर्कश स्वरानें ती म्हणाली,

" ठीक आहे असं नुसतं म्हणून कस चालणार? डॉक्टर आणायला मी जाऊं का काय?"

त्रासानें कपाळावर सतराशे आंठ्या चढवून श्रीकान्ताने धाडकन् हातांतले पुस्तक मिटले, आणि चिडून म्हटले,

" तूं कशाला जायला हवंस? मी आहे ना तुमचा बदा गुलाम! मी जातो— पैसे दे—हा निघालो मी—"

आता सुनन्दाहि खूब भडकली. रागाने ती म्हणाली,

" पैसे? हूंः! पैसे मी कुठून देऊ बाई?"

" कुठून म्हणजे? हा काय प्रश्न?"

" पूर्वीसारखे हल्लीं पगाराचे सगळे पैसे आपण माझ्यापाशीं द्यायला होतात का, याचा जरा मनाशींच विचार करावा. मग माझ्यापाशी अशा खर्चाला पैसे राहणार कुठून? सगळा पगारच्या पगार त्या कवटाळणी-च्या पायावर ओतून फक्त पन्नास रुपये आपण घरीं आणतां, त्यानं नुसत्या खाण्यापिण्याचा अन् जरूरीचा तरी संसारखर्च भागतो का? कांहीं तरी माणसानं स्वतःशींच विचार करून पहावा. औषधपाणी होणार कसं घरच्या माणसांच पैशाशिवाय?"

श्रीकान्त या कडाक्यामुळे पुष्कळ वरमला! केसावरून हात फिरवीत तो म्हणाला,

" मग आतां मी तरी काय करू ते तूंच सांग."

सुनन्दा आश्चर्यचकित होऊन म्हणाली,

" म्हणजे? काय करू याचा अर्थ तरी काय बाई? जवळचे पैसे घ्यावे—"

" माझ्याजवळ तर एकहि पैसा नाहीं!"

सुनन्दाचे आश्चर्य द्विगुणित झाले! पतीचे म्हणणें तिला पटलें नाहीं. ती म्हणाली,

" अशानं मी फसायची नाहीं—"

" फसूं नकोस तूं.पण खरच सांगतो—माझ्याजवळ आज पैसाही नाहीं—"

सुनन्दा व्यंग्योक्तीने म्हणाली,

" जवळ नसेल पैसा, तर बॅंकेतून काढून आणावे—".

श्रीकान्त गप्प बसला, व त्याने खिडकीतून बाहेर नजर लावली.

सुनन्दाने क्षणभराने विचारलें,

" काय? मीं म्हटलं ते ऐकायला नाहीं का आल? बॅंकेतून पैसे काढून आणावे—"

मान हलवून श्रीकान्त म्हणाला,

" त्यांत कांहीं अर्थ नाहीं—"

" म्हणजे?"

" म्हणजे काय? बॅंक-अकाउंटमध्यें माझी आतां कांहीं शिल्लकच नाहीं. मग पैसे काढूं कुठून?"

सुनन्दाच्या हृदयांत चर्रर् झाले. क्षणभर स्तब्ध राहून ती म्हणाली,

" बॅंकेत पैसा नाही? बॅंक-बुकांत तर खूब शिल्लक होती—"

श्रीकान्त मुखस्तभासारखा स्तब्ध बसून राहिला.

तीव्र स्वराने सुनन्दाने विचारले,

" इतका सारा पैसा झाला तरी काय? रक्कम का कमी होती? मला पक्क ठाऊक आहे—सहा हजारांपेक्षां काही ती रक्कम कमी नव्हती! मग एवढी थोरली रक्कम त्या पाढऱ्या पायांच्या अवदसेच्या पायांवर—"

श्रीकान्त तिला अडवून मध्येच ओरडला,

" चुप—चुप—चुप अगदी! जेव्हां तेव्हां अस भलतसलत बोलायचं तुला काम नाहीं. मी ते ऐकून घेणार नाहीं. तुला स्वच्छ सांगतो, की तिच्यासबंधानं तू एक शब्दहि बोलतां कामा नये—समजलीस? तिच्या पायांजवळ उभं रहायचीही तुझी वांदीरणीची योग्यता नाहीं, याची जाणीव आहे तुला?"

बिचारी सुनन्दा! मस्तकावर वज्राघात झाल्याप्रमाणे स्तंभितच झाली! पतिराजांच्या शिव्याशापाची मजल येथपर्यंत जाऊं शकेल, अशी स्वप्नांतहि तिची कल्पना नव्हती!

परतु प्रसंग बिकट होता. अभिमानाच्या भरीं पडून स्तब्ध रहाण्याची ती वेळ नव्हती. कसेहि करून मालूच्या औषधपाण्याची व्यवस्था करणे भाग आहे, हे सुनन्दाला स्पष्ट दिसत होते.

कांहीं वेळ स्तब्ध राहून नंतर ती हळुहळू बोलू लागली,

"पैसे नाहींत, तर कांहीं तरी उपाय केला पाहिजे. पोरीला वांचवायला तर हवं?"

"मग मी काय करूं ते तूच सांग."

"शेजारच्या मावशींकडून मी वीसपंचवीस रुपये आतां मिळाले तर पहाते. पहिल्या तारखेला पगार झाला म्हणजे त्यांचे तेवढे देऊन टाकावे—"

खिशांतून रुमाल काढून कपाळावरचा घाम पुशीत श्रीकान्त म्हणाला,

"बरं आहे—आण मिळाले तर—"

रुमाल काढताना श्रीकान्ताच्या खिशांतून कार्ड साईझचा एक फोटो खाली पडला. परतु ते त्याच्या ध्यानातहि आले नाहीं.

सुनन्दाने तो चट्‌दिशीं उचलून घेतला.

त्याच्याकडे पहात, कपाळाला आठ्या घालून तिने विचारलें,

"कुणाचा हा फोटो?"

श्रीकान्त किंचित् दचकला, व हात पुढे करून म्हणाला,

"दे इकडे तो—"

"पण कुणाचा हा?"

श्रीकान्त निर्लज्जपणाने म्हणाला,

"फ़्लोराचा. दे तो—"

सुनन्दानें पाहिले, फोटोमध्ये एक स्विमिंग ड्रेस (पोहोण्याचा पोषाक) परिधान केलेली अतिशय सुंदर तरुणी गोड अशा संभ्रमाच्या पवित्र्यांत उभी असून आपल्याकडे दृष्टि लावून उपहासानें हंसत आहे!

हीच ती फ्लोरा अं? गोऱ्या कातड्याच्या, पण काळ्याकुट्ट अंतः-

करणाऱ्या ज्या राक्षसी चेटकिणीने आपल्या पतीवर चेटूक करून आपला आणि आपल्या सोन्यासारख्या संसाराचा सत्यानाश केला, तीच ही चांडाळीण अवदसा !

सुनन्दाच्या हृदयांतील सूडाच्या प्रवृत्तीचा राखेखालीं झांकलेला अंगार एकदम झपाट्याने प्रज्वलित होऊन तिच्या अंगाची आगीआग होऊं लागली ! निमिषार्धांत, कांही विचार न करतां, हातांतील फोटो फाडून तिने त्याच्या चिंध्या चिंध्या उडविल्या, आणि ते कपटे आवेगाने जमिनीवर उडवून, त्यांच्यावर थुकून, डाव्या पायाने ते ती लाथाडूं लागली.

श्रीकान्ताच्याहि अंगाचा भडका उडाला ! कंपित स्वराने त्याने विचारले,

" काय केलंस हे ? "

तुच्छतेने हंसून आणि फोटोच्या कपट्यावर आणखी एक लाथ हाणून सुनन्दा म्हणाली,

" योग्य तेंच केलं—"

" फोटो फाडलास ?—"

सुनन्दा दिमाखाने पतीकडे पहात म्हणाली,

" हो—फाडला ! आणखीन् मिळाला तर शभर वेळां फाडीन ! मला भय का वाटतं आहे त्यांत ? मी तर म्हणते—"

श्रीकान्त धमकावणीच्या स्वराने मध्येच ओरडला,

" भारीसा फाजीलपणा चालवला आहेस तू, नन्दा ? काय, काय, काय समजली आहेस तू ? "

" समजायचं तेच समजलं आहे बरं ! "

श्रीकान्ताच्या क्रोधाचा पारा आतां भयंकर चढला. तो ओरडला,

" हां—नन्दा ! भारी काम वाढत चाललं ! वेळींच आवर घाल— असला फाजीलपणा चालवून घेणारा नवरा मी नव्हे ! "

सुनन्दाहि आतां हट्टालाच पेटल्यासारखी दिसली. ती म्हणाली,

" काय फाजीलपणा केला मीं यांत ? कोण काय करतं, ते साऱ्या जगाला दिसतंच आहे ! इकडे पोटची पोरगी औषधपाण्यावांचून तड-

फडते आहे अंथरुणावर चार दिवस,—अन् एका गोऱ्या अवदसेला घेऊन हॉटेलांतून दारूचे न् खाण्यापिण्याचे जलसे चालले आहेत रावसाहेबांचे दररोज! काल तर त्या बयेला टॅक्सींतून अगदीं घरापर्यंत घेऊन यायचं होत! हे तमाशे मीं का पाहिले नाहीत?"

जोराने हातवारे करीत श्रीकान्त ओरडला,

"बरं तर—पाहिलस तर खेटर गेल माझ! तुझ्यासारख्या घुबडिणीची कोण परवा करायला बसल आहे? कोण—तूं आपणाला समजतेस तरी कोण?"

"कोण? हं:—कांहीं मी कुणी बाजारांतून आणलेली नाहीं. चांगली देवा-ब्राह्मणांसमोर माळ घालून घरांत आणलेली लग्नाची बायको आहें—"

"बरं, असलीस तर असलीस! पायांची वहाण तूं—पायांशींच राहिलं पाहिजे तुला! घालीन त्या अन्नाची न् देईन त्या चिरगुटाची गुलाम तूं! अधिक बोलायची जरूरी नाहीं. माझा फोटो फाडणारी अशी तूं कोण बाजीरावाची बेटी मोठी?"

सुनन्दा दृढ स्वराने म्हणाली,

"लग्नाच्या बायकोचा अधिकार काय, ते सगळ्या जगाला ठाऊक आहे. फोटोच काय, पण पुन्हा जर त्या बाजारबसव्या अवदसेला घरापर्यंत आणायला झालं, तर तिचेदिखील असेच फाडफाडून तुकडे तुकडे करून टाकीन मी!"

डोळे लालबुंद करून आणि कपाळांत चढवून श्रीकान्त ओरडला,

"काय? बाजारबसवी—अवदसा?"

"हो—हो! बाजारबसवी, वेसवा, रांड, हलकट कुठची!"

"हां हां! तोंड आटोप! सभ्य घरच्या स्त्रीला हव तसं बोलून उगीच अपमान करू नकोस. परिणाम चांगला व्हायचा नाहीं. सांगून ठेवतो तुला—"

"चांगला व्हायचा नसेल, तर वाईट होईल. वाटेल त्याला माझी आतां तयारी आहे. अन् वाईट वाईट परिणाम तो आणखीं काय व्हायचा

राहिला आहे ? काय तरी बाई चमत्कार ! वेसवेला वेसवा म्हणायचं नाहीं, तर काय सती सावित्री का म्हणूं ? साहेबलोकांमध्यें कायद्यानं दोन बायका होऊं शकत नाहींत, अस मीं ऐकल आहे. त्या बयेला ठाऊक आहे, कीं तुमचं लगीन झालं असून तुमची बायकोहि चांगली धडधडीत जिवंत आहे ! तरी पण ती तुमच्याशीं—मग ती वेसवा नव्हे, तर कोण ? ”

श्रीकान्ताच्या क्रोधाला आतां पारावार राहिला नाहीं. हातांच्या मुठी घट्ट वळून आवेगभरानें तो खुर्चीवरून एकदम उठून उभा राहिला.

सुनन्दा गद्गद स्वराने म्हणाली,

“ मारायला का यायचं आहे ? ठीक आहे. मारावं, लाथाडावं—वाटेल ते कराव ! तेवढेच एक सस्कार राहिले आहेत व्हायचे—तेहि होऊन जाऊं द्या एकदांचे, म्हणजे सुटले ! ”

“ नन्दा—” श्रीकान्त बेफामपणे ओरडला.

सजल नेत्रांनीं सुनन्दा पतीकडे पहात बोलूं लागली,

“ छीः छीः ! किती दूरवर मजल गेली तरी ही इतक्यांतल्या इतक्यात आपली ! इतका अधःपात ! छीः ! आपली ही सारी कीर्ति लोकांच्या कानांवर गेली, म्हणजे मला काही लोकाना तोड दाखवायची सोय राहिली नाहीं ! ”

मालूचे अंथरूण तेथेंच असून, ती बिछान्यावर पडून इतका वेळ आईबापांचे भांडण मुकाट्याने पहात होती. ती एकदम रोगजर्जर स्वरानें म्हणाली,

“ बाबा, बाबा, आईला मारूं नका—आई किती किती च्यांगली आहे—”

सुनन्दाचे लक्ष चटकन् मुलीकडे गेलें, आणि तिच्या या करुण शब्दांनीं तर तिला अगदीं भडभडून आले.

मालतीकडे सजल नयनांनीं पहात सुनन्दा पतिराजांना म्हणाली,

“ ऐकलं ? गुणांची पोरगी माझी काय म्हणते ती ? एवढ्याशा या चिमरड्या पोरीला जो विचार आहे—काय म्हणं तरी आतां ? ”

रुग्णशय्येवर विकलपणें पडलेल्या मुलीकडे क्रुद्ध दृष्टीने पहात श्रीकान्त सुनन्दाला उद्देशून म्हणाला,

"टाक बोलून—आडपडदा कशाला? या चिमुरडया पोरीइतकी-दिखील अक्कल मला नाहीं, हेच ना म्हणायचं आहे तुला?"

"तोंडानंच कशाला म्हणू मी?"

"समजल!" श्रीकान्त ओरडला. "मला अक्कल किती आहे, त्याची मोजदाद करायला तुझ्यासारख्या दीडदमडीच्या बायकोची जरूरी नाहीं! तुलाहि मी आतां स्पष्ट न् स्वच्छ शब्दांत सांगतो, तूं वाटेल ते केलंस, तरी फ्लोराचा त्याग मी करणार नाहीं! यापुढ तिला घरींच घेऊन येणार आहें मी. पहातो मग तूं माझं काय शासन करतेस तें—"

भृकुटिभंग करून सुनन्दाने विचारले,

"काय म्हटलं? कुठं आणणार?"

"या इथ—माझ्या या घरीं!"

अर्ध मिनिट स्तब्ध राहून सुनन्दा पतीकडे पहात म्हणाली,

"ठीक आहे—आणावी इथं तिला. पण त्याच्या अगोदर माझी आपली माहेरीं रवानगी करून द्यावी! तुमच्या असल्या पापी ससारांत कुत्र्याप्रमाणं पडून रहायची मला आतां इच्छा नाहीं."

तुच्छतेने आणि बेपर्वाईने मान हलवून श्रीकान्त म्हणाला,

"ठीक आहे, ठीक आहे. खुशाल जाऊन रहा बापाच्या घरीं. तस झालं तर देवच पावला, असं मी समजेन! मला त्यांत अतिशय संतोषच आहे. इथं राहून रोजरोज असे झगडे करून डोक पिकवून घेण्यापेक्षां तें शतपटीनं बरं!"

"ठीक आहे—फार बरं वाटल मला हे ऐकून—"

ओठावर दांत रोवून, मस्तक हलवीत श्रीकान्त म्हणाला,

"हो ना? मग तसंच ठरलं तर! आतांच निघतां, बाईसाहेब? बोलवूं गाडी?"

दृढ स्वराने सुनन्दा म्हणाली,

"हं, बोलवावी—"

" बरं आहे, आपलं सामानसुमान काय न्यायचं असेल बरोबर, तें बांधूनबिंधून घ्या गोळा करून—ही गाडी आलीच म्हणून समजा—"

असे म्हणून श्रीकान्त झपाट्याने तेथून निघून गेला.

सुनन्दा जागच्या जागीं स्तंभितच होऊन उभी राहिली.

तिचे मस्तक अगदीं सुन्न होऊन गेलें. काय करावें ते तिला सुचेना !

सुनन्दा क्षणभरानें शेजारच्या खुर्चीवर बसून विचार करूं लागली. आतां आपण करावें तरी काय ? पतिराजांच्या अधःपाताची मजल येथ-पर्यंत पोंचेल, अशी स्वप्नांतहि आपली कल्पना नव्हती ! परंतु प्रत्यक्षच आतां आपणाला असा अनुभव आला !

पतिराजांना उद्वेगाच्या व रागाच्या भरांत आपण माहेरीं जाऊं म्हणून सांगितले खरें—त्याप्रमाणें जावे का आपण ? गेलो तर जगाच्या आणि आपल्या दृष्टीने ते योग्य ठरेल का ?

जावे हेच उत्तम ! डोळ्यांसमोर पतिराज नरकाच्या मार्गानें एक-सारखे खालीं खालीं जात चालल्याचे दृश्य तरी आपणाला पहावे लागणार नाहीं. क्षणोक्षणीं, पदोपदीं शिव्याशाप आणि कर्णकठोर वचनें आपणाला ऐकावीं लागणार नाहींत. जन्मांत कधीं झाला नाहीं असा अपमान जेव्हां तेव्हां आपणाला सोसायला नको !

मालू ही अशी आजारी पडली आहे; माहेरीं आपण गेलों, तर तिच्या औषधोपचाराची आणि पथ्यापाण्याची उत्कृष्ट व्यवस्था होऊन ती लवकर बरी होण्याच्या मार्गाला लागेल.

जावें हेंच ठीक ! परतु—सुनन्दा विचार करूं लागली.

या प्रश्नाला दुसरीहि एक अत्यंत महत्त्वाची बाजू आहे !

आपण माहेरीं निघून गेल्यावर आपल्या सत्तेच्या या घराची आणि संसाराची पुरी धूळधाण उडाल्याशिवाय राहील का ? पतिराजांची उच्छृंखलता तर अगदीं शिगेला पोंचेल ! त्यांनीं धमकी दिल्याप्रमाणें खरोखरच केल्याशिवाय ते रहाणार नाहींत. त्या गोऱ्या काळतोंडीला खरोखरच आपल्या घरीं आणून ठेवून दिवसरात्र ते नंगा नाच घालतील !

आपले पतिराज असे वहावले आहेत, त्यांचें चारित्र्य पराकाष्ठेचें

बिघडले आहे, अशी दुष्कीर्ति चहूंकडे व्हायला मग कितीसा अवकाश लागणार आहे? पतीच्या अशा चरित्रहीनतेच्या कलंकापेक्षां स्त्रीला अधिक मानहानीची किंवा लज्जास्पद अशी दुसरी गोष्ट कोणती?

नाहीं, आपण येथून जाणे बिलकुल योग्य नाहीं! आपले हे एकच्छत्री साम्राज्य सोडून, आपले सत्तेचे घर सोडून जावयाचें कोठे आणि कां म्हणून? पतिराज आपला हा अधिकार काढू पहात असले, तरी आपखुषीनें तो आपणच सोडून देऊन त्यांना चारी वाटा मोकळ्या करून देणें हे केव्हांहि शहाणपणाचे ठरणार नाहीं. जे कांहीं आपल्या हातून गेलें आहे, तें पुनरपि मिळवून घ्यावे, आणि जपून ठेवावे, हेच पत्नी या नात्याने आपले ध्येय असले पाहिजे; आणि ते पूर्ण करण्याची आपण आपणाकडून शिकस्त केली पाहिजे!

सुनन्दा तशीच उठली, आणि मुलीच्या बिछान्यापाशीं गेली. मालूला शान्त गाढ झोप लागली आहे, असे तिला दिसले. तिनें एक गाढ उसासा टाकला, व खालीं वांकून तिने तिच्या गालाचें हळूच चुंबन घेतले.

मोलकरीण मागच्या दारीं काम करीत होती, तिला 'आत्तां येते हं— जरा मालूकडे लक्ष ठेव,' असें बजावून सुनन्दा शेजारीं पार्वतीकाकूकडे गेली.

मावशीकडे तिने पंचवीस रुपये उसने मागितले. ते तिला तत्क्षणीं मिळालेहि.

मनोहरला डॉक्टरला बोलावून आणायला व येतांना मोसंबीं वगैरे फळें आणायला रवाना करून ती लगेच परत आली.

मालू अजूनहि तशीच झोंपली आहे, असें पाहून सुनन्दाला फार बरें वाटलें. ती तशीच तिची बार्ली तयार करण्याकरितां स्वयंपाकघराकडे गेली.

इतक्यांत श्रीकान्ताची स्वारी तेथें येऊन ठेपली. तो म्हणाला,

"हं—बाहेर गाडी आणली आहे. फार खोटी होतां कामा नये तिची. सगळं सामानसुमान काय घ्यायचं तें घेतलंस ना व्यवस्थित भरून?"

त्यांच्याकडे न पहातांच मृदु स्वराने सुनन्दा म्हणाली,

"नाहीं—"

श्रीकान्ताने कपाळाला आंठ्या चढवून रागाने विचारलें,

" नाहीं ? कां ? "

" उगाच ! "

" उगाच ? म्हणजे ? जात नाहींस तूं ? "

सुनन्दा शांन्तपणे म्हणाली,

" नाहीं. "

श्रीकान्त खूब भडकून म्हणाला,

" नाहीं म्हणजे काय ! जायचं नव्हतं, तर उगाच मला असं हैराण केलंस कशाला ? "

" काय—झाल तरी काय एवढ हैराण व्हायला ? "

" काहीं नाहीं—ते कांहीं चालायच नाहीं आतां. 'नाहीं' म्हणून नुसतं आतां भागण्यासारख नाहीं. जायलाच हव तुला—"

गर्वोद्धत स्वराने गर्जना करून सुनन्दा म्हणाली,

" जबरदस्ती करून माझी रवानगी करणार वाटतं ? वाः—छान ! माझी खुषी—मीं नाहीं जात ! इथ्थ अश्शीच रहाणार ! "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे तेच ! जात नाहीं मी ! मला घालवून देऊन सगळं रान एकदां मोकळं झाल्यावर हव तसं वागायला अन् थैमान घालायला चारी दिशा मोकळ्या मग, नव्हे ? अगदीं निश्चित मनानं नंगा नाच घालायला सोपा ! नाहीं जाणार मी—बस्स ! "

श्रीकान्त त्रासून कपाळाला आंठ्या घालून म्हणाला,

" काय नसता त्रास आहे शिंचा ! मीं तुला एका अक्षरानं तरी जायला सांगितलं होतं का ? स्वतःच तर तू तावातावानं जायला निघालीस–"

चार दोन वेळ माना वेळून, तिरस्काराच्या स्वरानें सुनन्दा म्हणाली,

" हो—निघाले होते—वाटलं होतं तसं–पण आता नाहीं माझी मर्जी लागत ! साफ जात नाहीं मी. इथ्थं रहाणार ! "

श्रीकान्त कांहींच न बोलतां तेथून निघून गेला. गाडीवाल्याला थोडी बक्षिसी देऊन कसे तरी त्याने त्याला घालवून दिले.

# आठ .... .... . .... बेतबात !

मिस् फ्लॉरेट टेम्पल आणि मिस्टर श्रीकान्त मुजुमदार या उभयतांमधील स्नेहसंबध म्हणा, किंवा प्रेमसबध म्हणा, दिवसेंदिवस अधिकाधिक घनदाट होऊं लागून अलीकडे तर त्याचे स्वरूप पराकाष्ठेचे—अगदी घनिष्ट होऊन राहिले होते !

श्रीकान्त आतां फ्लोराला कांही पूर्वीसारखा दूरत्व दर्शविणाऱ्या 'मिस् टेम्पल' या नांवानें संबोधित नसे. तो तिला अलीकडे 'फ्लोरा' म्हणे, कधीं 'फ्लो' म्हणनच संबोधी, तर कधीं नुसते 'डार्लिंग' म्हणे—आणि केव्हां केव्हां, फारच रंगांत आला म्हणजे, श्रीकान्त तिला 'कुसुमिका', 'सुमी' अगर नुसते 'कुस्मी'च म्हणे !

फ्लोराने हंसून त्या शब्दांचा अर्थ विचारला, म्हणजे तो म्हणे,

"ठाऊक नाहीं तुला ? आमच्या सस्कृतमधल नाव आहे हे. 'फ्लॉरेट्' म्हणजे लहान फूल; म्हणजे सस्कृतमधल 'कुसुमिका', अन् त्याचच ऱ्हस्व स्वरूप 'कुस्मी'! 'कुस्मी' सस्कृत ब्यूटी( सौंदर्य ) आहे आमची ! हाः हाः !"

फ्लोराच्याहि 'मिस्टर मुजमुडार' या पूर्वीच्या सबोधनांत आतां पुष्कळ फरक झाला होता ! श्रीकान्ताला आतां ती क्रमाने 'शिरिकॅन्ट' 'शिरी' किंवा नुसतेच 'डियर' म्हणे ! 'श्री' या संस्कृत शब्दाचा अर्थ तिने विचारून घेतला होता. त्यावरून लाडालाडाने ती त्याला कधीं 'मनी' असेहि संबोधी ! श्रीकान्ताच्या सहवासाचे सुख फ्लोराला पैशाइतकेच प्रिय आणि उन्मादक वाटे !

फ्लोराने अलीकडे कुलाब्यावरील त्या गचाळ गल्लींतील तो चिमुकला फ्लॅट सोडला असून मरिन लाइन्सवरील एका छोट्या टुमदार चित्रासारख्या सुंदर बगल्यांत ती येऊन राहिली होती. तिचा खर्च अर्थातच आतां तिचा प्रियकर 'मनी' उर्फ 'शिरी'च चालवीत असे.

कारण—उघडच आहे! बिचारी फ्लोरा मनानें खूब श्रीमंत असली, तरी पैशाने फार गरीब होती! एका व्यापारी कंपनीच्या ऑफिसमध्यें स्टेनोटायपिस्टचें काम करून बिचारी फक्त शभर रुपये महिना मिळवी! या एवढ्याशा पैशांत ती गरीब बिचारी करणार तरी काय? नुसत्या तिच्या पोषाकाबिषाकालाच एवढी ही रकम पुरी पडत नसे! बिचारीला आई, बाप, भाऊ, बहीण कुणी म्हणून कुणीही नव्हतें!

खरोखरच फ्लोरा ही एक हतभागी आणि दुःखी मुलगी होती. तिच्याविषयीं विचार करतांना श्रीकान्ताचे प्रेमळ हृदय सहानुभूतीच्या आणि कारुण्याच्या रसानें अगदीं ओलेचिंब होऊन जाई!

तसे म्हटले तर फ्लोराचे म्हणणें अगदी सरळ होते. श्रीकान्तावर तिचे प्रेम अतिशय जडले होते, हे तर खरेच; परतु त्याची गाढता इतकी होती, कीं प्रियवल्लभाचा सहवास चिरकाल लाभावा म्हणून ती त्याच्याशीं लग्न करावयाला पराकाष्ठेची आतुर होऊन राहिली होती!

परंतु तिच्या या प्रस्तावाला श्रीकान्तच कबूल होत नव्हता. त्याच्याकडूनच विवाहाला हरकत उपस्थित झाली होती. आपले लग्न झाले असून आपणाला एक मुलगीहि आहे, या वस्तुस्थितीचे श्रीकान्त फ्लोराला वारंवार स्मरण करून देत असे. अशा परिस्थितींत फ्लोराशीं आपले लग्न झाले, तरीहि ते कायदेशीर दृष्टीने सिद्ध होणे अशक्य आहे, असें तो तिला समजावीत असे.

एके दिवशीं असे त्याने सांगितल्यावर फ्लोरा चेहरा अगदीं खिन्न करून उद्वेगानें म्हणाली,

"पण डियर शिरी, अशा रीतीन आपण दोघंजणं एकत्र रहाणंहि न्यायसमत होत नाहीं, हे कस ध्यानांत येत नाही तुझ्या? खरं म्हटलं तर हा प्रश्नहि अत्यन्त महत्त्वाचा आहे, नाहीं का? त्याच्याबद्दलहि गंभीरपणं आपणाला विचार केला पाहिजे. समज, कीं, जर—"

असे म्हणून फ्लोरा मध्येच एकदम थांबली.

श्रीकान्त जवळच बसलेला होता; तो आणखींहि तिच्या जवळ जाऊन प्रेमभरानें तिचे गाल किंचित् कुसकरल्यासारखें करून म्हणाला,

" ते मला माहीत आहे, डार्लिंग ! "

मान वेळून कृतक कोपाने श्रीकडे पहात फ्लोरा म्हणाली,

" माहीत आहे म्हणतोस, अन् उपाय तरी कांहींदिखिल करीत नाहींस ! कांहीं तरी निश्चित करायला नको का या बाबतींत ? "

श्रीकान्त हंसून म्हणाला,

"अग हो हो, कुस्मी डार्लिंग ! इतकी अगदीं हातघाईवर कां येतेस?"

फ्लोरा त्याला किंचित् धक्का देऊन म्हणाली,

" वा–वा–वा, डियर मनी ! हे–हेंच का तुझं माझ्यावरचं प्रेम तें ? माझी बदनामी अन् फजीती व्हावी चहूंकडे, अशी का तुझी इच्छा आहे, शिरिकॅन्ट ? "

वल्लभेचा हात श्रीकान्ताने हातीं घेतला, आणि त्यावरून मृदुपणें हात फिरवीत तो किंचित् गंभीरपणें म्हणाला,

" सिली गर्ल ( खुळी भाबडी पोर ) ! तूं म्हणतेस ते खरं आहे. बरं, कुसुमिका, तूंच सांग ना मला, मी काय करूं ? तुला सुखी अन् आनंदी करायला जरी जळत्या आगींत उडी घ्यावी लागली मला, तरी त्याला मी माघार घेणार नाहीं, हे तुला ठाऊक आहेच ! "

' कुसुमिका ' कांही वेळ विचारांत स्तब्ध राहून म्हणाली,

" बर डियर, मी तुला प्रश्न विचारूं एक ? खरं, खरं, मनापासून खरं सांगशील मला ? "

' डियर ' तिचा हात दाबीत स्मितपूर्वक म्हणाला,

" वा–म्हणजे ! त्याबद्दल कांही शंका का वाटते तुला ? विचार ना–"

" आपल्या बायकोवर तुझं फारसं प्रेम नाहीं का ? "

मुद्दाम खोडसाळपणे हसून श्रीकान्तानें प्रश्न केला,

" वुइच वन् ( कोणती पण ) ? "

फ्लोरा खूब मोठ्याने हसून श्रीकान्ताकडे प्रेमकटाक्ष फेकून उत्तरली,

" धि मॅरिड वन् ( लग्न केलेली )—"

श्रीकान्त हंसला. त्यांत किंचित् विषादाचीहि छटा होती. तो म्हणाला,

" खरं सांगूं तुला ? अगदीं मुळींदिखील नाहीं ! "

" बरं, दुसरीवर ? "

श्रीकान्तानें फ्लोराला अगदीं जवळ ओढून घेतलें, आणि तिचा चेहरा वर करून आपल्या मुखाजवळ आणून तो हसत हंसत उद्गारला,

" लेट् मी शो यू माय स्वीट गर्ल ! ( हृदयहारिके, प्रत्यक्षच तें तुला मी दाखवतो ! ) "

वल्लभाच्या गळ्याला आपल्या भुजलतेचा वेढा देऊन फ्लोरा लडिवाळपणें म्हणाली,

" चल, शिरी ! आपण इथून मुकाट्यानं पळून होमला ( इंग्लंडला ) जाऊं या—तिथं काय, आमचंच राज्य ! स्वातंत्र्याचं माहेरघर तें ! तिथं कुणी कुणाला विचारायचं नाहीं, इंडिया( हिंदुस्थानां )त तुझी एक नेटिव्ह बायको आहे, असं तिथ कुणालादिखील कळून येणार नाहीं."

श्रीकान्त अत्यत उल्हासाने म्हणाला,

" वाः ! ग्रँड आयडिया ( उत्कृष्ट कल्पना ) ! "

" आवडली तुला ? "

" अगदीं मनापासून ! तुमचा तो लोभनीय देश पहायची इच्छा अगदीं लहानपणापासून माझ्या मनात आहे, फ्लोरा ! पण—"

" पण ! पण काय ? "

एक मोठा सुस्कारा टाकून श्रीकान्त उद्वेगानें म्हणाला,

" पण ते भयकर खर्चाचं काम, माय डार्लिंग ! "

प्रियकराच्या खांद्यावर हात ठेवून मृदु स्वराने फ्लोरा म्हणाली,

" असूं दे ! पण चलच तू ! कसं तरी करून एकदां इंग्लंडमध्यें जाऊन आपण पोंचलो, कीं मग—"

" कीं मग काय, कुसमी ? " उत्सुकतेने श्रीकान्ताने प्रश्न केला.

" मग कोणती अडचण आपल्या प्रेमाच्या ससारात येणार आहे ? "

" कां बरं ? " तो हंसून म्हणाला. " इंग्लंडमध्यें संसाराला खर्च लागत नाहीं ? "

त्याच्या गालावर एक हलकी चापट देऊन फ्लोरा म्हणाली,

"यू नॉटी डार्लिंग ! आपणां दोघांना मिळून तेवढा खर्च चालवतां नाहीं येणार ?"

श्रीकान्ताला हा युक्तिवाद मनापासून पटणें अशक्य होते. परंतु प्रियेच्या समाधानार्थ तिचें म्हणणें त्याला कबूल करावे लागले.

* * *

अशा रीतीचे संभाषण यानंतर त्या प्रेमी युग्मामध्यें पुष्कळ वेळ झाले, आणि फ्लोरानें सुचविलेला बेत शेवटीं पक्का झाला.

त्यांनीं असे निश्चित केले, कीं पंधराएक हजारांची रक्कम जमवून दोघांनींहि विलायतेला जावयाचें; तेथें विवाह करून टुमदार संसार मांडावयाचा; दोघांनींहि कांहीं तरी उद्योगधंदा करून पैसे मिळवावयाचे. पैशाकडून अशा रीतीने कमतरता पडणे शक्य नसल्यामुळे संसाराग्निरथाच्या इंजिनांत इंधनाचा तुटवडा येण्याची भीतिच नाहींशी झाली होती. विलायतेंतच उद्योगधंदा करून श्रीकान्ताने बॅरिस्टरीच्या टर्म्सहि भरावयाच्या होत्या. तो बॅरिस्टर झाल्यावर त्या उभयतां 'पती-पत्नीं'नीं पुनः हिंदुस्थानांत परत यावयाचें, आणि एकदम पंजाब, यू. पी. किंवा बंगालमध्ये जाऊन श्रीकान्ताने प्रॅक्टिस सुरू करावयाची, असा त्यांच्या बेताचा शेवटचा म्हणजे मनोरथमंदिराच्या कळसाचा भाग होता. मुंबईच्या आसपास जोंपर्यंत आपण फिरकलों नाहीं, तोंपर्यंत श्रीकान्ताच्या पहिल्या लग्नाची गोष्ट जाहिर होणे शक्यच नाहीं, असा त्या उभयतांचा पूर्ण विश्वास होता.

दोघांच्याहि भविष्यकालचे हे अत्यंत सुंदर व रंगदार चित्र मानसनेत्रांपुढे येतांच—आणि ते एकसारखे येतच असे!—श्रीकान्ताचें मन आनंदानें आणि उल्हासानें अगदीं प्रफुल्ल होऊन जाई! अशा हेवा वाटण्यासारख्या भाग्याचा शिल्पकार फ्लोरा असल्यामुळे तिच्याबद्दलच्या त्याच्या प्रेमादरांत विलक्षण भर पडत असे.

या एकंदर मनोरथमंदिराचा आकार आणि प्रकार तर अत्यंत भव्य आणि पराकाष्ठेचा सुंदर होता. परंतु ते मंदिर कल्पना किंवा भावना यांच्या राज्यांतून प्रत्यक्षांत अवतरावयाला मुख्य अडचण होती ती पैशाची!

पंधरा हजार रुपये! पं-ध-रा ह-जा-र! एवढी रक्कम उभी करायची तरी कुठून ?

श्रीकान्ताने मनाचा पूर्ण निश्चयच केला, कीं वाटेल त्या उपायांनीं ही रक्कम उभी करायचीच!

बॅंकेमध्ये आणि पोस्टांत आजवर त्याने जी रकम वेळोवेळीं शिलकी टाकली होती, ती सारी आतां त्याने काढून घेतली. या सर्व रकमा मिळून जवळ जवळ आठ-सव्वाआठ हजार रुपये झाले. बाकीचे सात हजार रुपये आतां कुठून आणायचे ?

प्रश्न अतिशय बिकट होता! श्रीकान्त मोठ्या चिंतेत पडला.

त्याच्या मनापुढे एकदम एक कल्पना उभी राहिली. सुनन्दाच्या वडिलांनीं तिला मृत्युपत्राने काहीं रक्कम दिली आहे, हे चटकन् त्याच्या लक्ष्यांत आले. परतु ते तिच्याजवळ मागायचे कोणत्या तोंडाने, आणि ते आपल्या हातीं येणार तरी कसे ?

* * *

श्रीकान्ताचे मन पराकाष्ठेचे उदास झाले होते. त्याला कशानेच बरे वाटत नव्हते. एकसारखा एकच मनापुढे विचार!

पैसा कसा उभा करूं ? सात हजार रुपये! कमी का ही रक्कम ?

श्रीकान्ताचें कपाळही ठणकत होते. कामांतहि त्यामुळे चित्त लागत नाहीं, असे पाहून मॅनेजरची संमति घेऊन श्रीकान्त चारएक वाजताच आज ऑफिसबाहेर पडला.

आतां जावें तरी कोठे, असा त्याला विचार पडला. घरी जायला त्याचे मनच तयार होईना! ती निरानद उदासीनता, बायकोचा कायम रुसवाफुगवा, तिरस्कारयुक्त अबोला, इत्यादि पराकाष्ठेच्या अनिष्ट गोष्टींनीं परिपूर्ण असलेले घरचे वातावरण त्याच्या मनासमोर उभे राहिलें, कीं श्रीकान्ताला अगदीं शिसारीच येई!

घर अगदीं त्याला नकोसेच झाले होते!

श्रीकान्तानें डाव्या मनगटावरील छोट्या घड्याळाकडे पाहिले. चार वाजन दोनतीन मिनिटें झालीं होतीं. जावें कोठें ?

या वेळीं हृदयवल्लभा कुसुमिका आपल्या ऑफिसांत पत्रें आणि ड्राफ्ट्स् दणादण टाइप करीत बसलेली असणार! तिचे मन सर्वस्वीं आपणाकडे वेधून राहिलेले असले, तरी तिचे शरीर ऑफिसातील त्या इवल्याशा खोलींत असेल! साडेपांचापूर्वीं ती घरीं परत येईल, हे शक्यच नव्हतें.

मग इतका मधला कंटाळवाणा वेळ काढावा तरी कुठे? काय करावें?

श्रीकान्ताने मनाशीं बराच विचार करून शेवटीं निश्चित केलें, कीं इतर कुठें जाण्यापेक्षां मरिन लाइन्सवरील त्या आनंदनिवासात जाऊन आपल्या वल्लभेची वाट पहात पडून रहावे. त्या दिवशींचा टाइम्स किंवा 'स्ट्रँड'मधील एकादी प्रेमकथा वाचीत तास-सवातास कसाबसा काढावा, तो फ्लोरा येईलच. आपण अगोदर येऊन तिची वाट पहात इतका वेळ बसलो आहो, हे समजताच प्रियेच्या मुखावर आनंदकौतुकाचे जें भावप्रतिबिंब उमटेल, त्याचें चित्र मनांत येऊन श्रीकान्ताचा चेहरा प्रफुल्ल दिसूं लागला.

बंगल्यावर पोहोचतांच 'बॉय्' सलाम करून म्हणाला,

" मेमसाब अदर है, हुजूर ! "

त्याने सांगितलेली ती बातमी ऐकून श्रीकान्ताला अत्यत आश्चर्य वाटले, आणि आनंदहि झाला. तर मग आपणाप्रमाणेच ऑफिसला कांहीं तरी कामानिमित्त ' बुट्टी ' देऊन कुस्मीही घरीं पळून आली अं?

टेलिपथी का कायसे म्हणतात, ते तर हे नसेल? दोघांच्या हृदय-मनांची किती एकजीव जुळणी झाली आहे ही पहा!

अत्यंत उल्हास-उत्साहाने श्रीकान्त त्वरेने बंगल्यांत गेला.

ड्रॉइंग-रूम( दिवाणखान्या )च्या दरवाजावरील पडदा सरकवून आंत पाऊल टाकतांच श्रीकान्ताला जे कांहीं दिसले, त्याने तो आश्चर्य-स्तंभितच होऊन गेला!

त्याची हृदयेश्वरी फ्लोरा आणि एक युरोपियन तरुण दोन आराम-खुर्च्यांवर अगदीं जवळ—पण समोरासमोर बसलीं असून परम उल्हासानें गप्पागोष्टी करण्यांत अगदीं दंग होऊन गेलीं आहेत, असें त्याच्या दृष्टीला पडलें.

श्रीकान्त तर थबकून जागच्या जागीं उभा राहिला. भृकुटि आकुंचित करून तो आपणाशींच विचार करूं लागला—कोण—हा तरुण साहेब आहे तरी कोण? आणि या भलत्याच वेळीं येथें येऊन फ्लोराशीं हा इतक्या सलगीनें एकान्तांत काय बोलत बसला आहे?

त्याचा चेहरा खर्रकन् उतरला. आंवढा गिळून तो चाचरत म्हणाला,

"एक्स्क्यूज मी प्लीज! (क्षमा करा मला!) मला वाटलं होतं, कीं फ्लोरा एकटीच आहे!"

श्रीकान्ताला पहाताच फ्लोरा एकदम हंसत हसत उठली, व म्हणाली,

"ओ डार्लिंग—डार्लिंग! यू नीड नॉट हेजिटेट! (ओ! प्रियकरा, तुला घोटाळायचं कांही कारण नाहीं.)—"

"ओ—नो—थॅंक यू! (नाहीं—त्याबद्दल मी आभारी आहें.)"

पूर्ववत् हंसत फ्लोरा बोलू लागली,

"मिस्टर क्रॅंपला आपण इंग्लडला जाणार ही बातमी कळली, अन् त्यासंबंधानंच विचारायला तो आला आहे आतां—"

नंतर श्रीकान्ताचा हात धरून तिने परिचय करून दिला,

"मिस्टर क्रॅंप—माझे पूर्वीचे शेजारी अन् मिस्टर मुजमुडार, माय फायेन्स (माझे भावी पतिराज)!"

मिस्टर क्रॅंप चटकन् खुर्चीवरून उठला, आणि श्रीकान्ताशीं हंसत हंसत हस्तान्दोलन करून म्हणाला,

"गुड आफ्टरनून, मिस्टर मुजमुडार! (नमस्कार!) मिस् टेम्पल आतां आपणाविषयींच माझ्याशीं बोलत होत्या. आपली भेट झाल्याबद्दल मला अंतःकरणपूर्वक आनंद झाला आहे, मिस्टर मुजमुडार!"

श्रीकान्ताच्या मनावर आलेले संदेहपटल बहुतेक दूर झाले. हंसत तो म्हणाला,

"थॅंक्स्, दॅट यू से सो! (तुम्ही असं म्हणतां, याबद्दल तुमचा मी आभारी आहें.)"

नंतर फ्लोराकडे वळून तो उल्हासपूर्वक म्हणाला,

"हाउ स्वीट ऑफ यू, फ्लोरा, टु स्पीक अबाउट मी टु मिस्टर

क्रंप! (माझ्याबद्दल क्रंपना तूं असं सांगावंस, हें खरोखर तुझ्या गोड स्वभावाला उचितच आहे.)"

फ्लोरा यावर फक्त मृदु मृदु हंसली.

श्रीकान्तानें विचारले,

"मिस्टर क्रप, फ्लोराविषयीं आपलं काय मत आहे?"

एकवार फ्लोराकडे आणि नतर मुजुमदारकडे पाहून क्रंप स्मितपूर्वक म्हणाला,

"खरोखर, आपण अत्यत भाग्यशाली, मिस्टर मुजमुडार! म्हणूनच मिस् टेम्पलसारख्या अत्यत मूल्यवान् स्त्री-रत्नाचा लाभ आपणाला झाला! खरोखर, आपल्या भाग्याबद्दल आपला मला फार हेवा वाटतो!"

माना वेळून हसत हसत फ्लोरा म्हणाली,

"डोन्ट फ्लॅटर, मिस्टर क्रंप! (उगीच तोंडावर स्तुति नका करूं माझी, क्रप!) आपण दोघंहि एकाच मातीचे घडलेले दिसतां! बोलून चालून पुरुष!"

आणखींहि इकडे तिकडे थोड्याशा गप्पागोष्टी झाल्यावर क्रंप त्या उभयतांचा निरोप घेऊन निघून गेला.

नतर क्षणभराने फ्लोरा श्रीकान्ताकडे पाहून मृदु स्मित करून म्हणाली,

"तुझ्यासाठीं अर्धा डझन सूट (कपडे) मीं तयार करवून आणून-दिखील ठेवले आहेत आज, शिरी! चल ये, बघ तर खरे कसे सुदर सुदर आहेत ते!"

आपल्या हृदयवल्लभेच्या व्यवहारनिपुणतेबद्दल श्रीकान्ताचा आदर दसपट वाढला! ह, नाहीं तर आपली ती 'नेटिव्ह' बायको! कांहीं धोरण, का व्यवहार, का—

तो हर्षातिशयाने उद्गारला,

"खरंच, कुस्मी? माय स्वीट गर्ल (किती गोड पोरगी आहेस ग)! कुठं—कुठं, पाहूं?"

दोघेंजणें शेजारच्या दालनांत जाऊन कपडे पारखून पाहूं लागलीं.

कपडे पाहून झाल्यावर फ्लोरा श्रीकान्ताच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली,

" कसे सुंदर आहेत, नाहीं ? माझ्या राजाला ते कसे शोभतील पण ! "

" हो, माझ्या सुंदर राणी ! "

" इतक्या सूटवर तूर्तातूर्त भागेल तुझं ! काय—नाहीं वाटत तुला असं ? "

" भागेल तर काय झालं ! "

" पुढं, होम( घरीं )ला गेल्यानंतर तिथं आणखीं अर्धा-पाऊण डझन करवून घेतले, कीं चगळ झाली ! नाहीं रे, मनी ? हो, पण बरी आठवण झाली ! पैशाचं काय केलंस ? झाली कीं नाहीं अजून तजवीज ? "

विषण्ण चेहऱ्याने मान हलवून श्रीकान्ताने 'नाहीं' म्हणून दर्शविलें.

" नाहीं ? "

निःश्वास टाकून श्रीकान्त खेदस्वराने म्हणाला,

" नाहीं ग, कुस्मी ! अजून कांहींच त्याची व्यवस्था मला करतां आली नाहीं ! "

फ्लोरा अगदीं हताश झाल्यासारखी दिसली. खिन्न स्वराने ती म्हणाली,

" तर मग हा सीझन ( कालखड ) फुकट जाणार म्हणायचा ! "

श्रीकान्त कांहींच बोलला नाहीं.

क्षणभरानें उद्विग्नपणें फ्लोरा बोलूं लागली,

" मिस्टर क्रंप आतांच सांगत होता, हा सीझन होमच्या मुशाफरीला भारी फक्कड असतो. समुद्रांत वारेबिरे छान मजेदार वहात असतात. हवा फार सुंदर असते. याच वेळेला प्रवास करणं फार आरामशीर अन् सुखकारक असतं—"

कांहीं वेळ स्तब्ध राहून श्रीकान्ताने विचारलें,

" बरं, आपलं कोलंबोवरून जायचं हें तर नक्की ?"

" अगदीं नक्की! इथून जाणं मला न् तुला दोघांनाहि अमळ—अमळ कां, बरंच धोक्याचं. आपली सारी मंडळी इथं. केव्हांच बातमी पसरायची, अन् प्रवासांत नाहीं नाहीं त्या भानगडी उपस्थित व्हायच्या. शिवाय, होमला जाण्यापूर्वी वाटेत मद्रासला मला तीनचार दिवस रहायचं आहे. तिथं माझा जन्म झाला, न् लहानपणहि माझं तिथंच गेलं. तेव्हां त्या जागेचा मला जाण्यापूर्वी निरोप घ्यायचा आहे. माझं जन्मस्थान पुन्हां कधीं माझ्या दृष्टीला पडतं न् कधीं नाहीं! तेव्हां आपण कोलंबोवरूनचा मार्ग ठरवला आहे, तेच ठीक—पासपोर्टचीहि मीं व्यवस्था केली आहे, आमच्या ऑफिसांतल्या एका स्नेह्यामार्फत—पण—"

" बरं, कोलंबोहून बोट कधीं निघते ?"

" एकवीस तारखेला—आज दहा तारीख. म्हणजे फक्त दहाअकरा दिवस मध्यें आहेत राहिलेले. मद्रासला थोडे दिवस रहावं, असा माझा हेतु आहे; तो कांहीं तुझ्या या दिरगाईमुळ सिद्धीला जात नाहीं, असं मला दिसतं, शिरी!"

असें म्हणून फ्लोरानें दुःखाचा एक मोठा उसासा सोडला.

प्रिय वल्लभेची निराशा आणि दुःख कोणत्या वल्लभाला सहन होईल! श्रीकान्तानें फ्लोराला ओढून जवळ घेतलें, आणि हंसत हंसत तो म्हणाला,

" डोन्ट गेट सो मोरोज, डार्लिंग! (इतकी दुर्मुखलेली नको होऊं गडे!) मी तुला अगदीं वचन देतों, कीं काय वाटेल तें करून बारा तारखेच्या आंत आपणांला पाहिजे आहे ती रक्कम मी उभी करतों—"

फ्लोरानें प्रियकराकडे एक सस्मित कटाक्ष फेंकला, आणि त्याच्या गालावर आपला गुलाबी गाल ठेवून दिला.

## नऊ .... .... .... काळरात्र आणि 'उजेड'!

श्रीकान्त काल सकाळीं जो ऑफिसात म्हणून गेला, तो अद्यापि घरीं परत आला नव्हता!

बिचाऱ्या सुनन्दाच्या मनाची स्थिति काय आणि कशी झाली असेल, याची कल्पना करणें कांहीं फारसे कठीण नाहीं. अलीकडे नवराबायकोचे प्रेमसंबंध जरी अगदीं बेतास बात होते—किंबहुना विशेष कांहीं नव्हतेच, असे म्हणणे रास्त आहे—तरी सुनन्दा ही एक हिंदु स्त्री असून श्रीकान्ताची धर्मपत्नी होती; आणि धर्मदृष्ट्या किंवा व्यवहारदृष्ट्याहि श्रीकान्त हा तिचे इहपरलोकचे निधान आणि सर्वस्व होते!

पतिराजाचा कालच्या सबंध दिवसात आणि आजहि इतका वेळ कोठें पत्ता नाहीं, हें पाहून सुनन्दा पराकाष्ठेची चिन्ताक्रान्त झाली. काय करावे, कुणाला पुसावे, कुठे शोध घ्यावा, हे तिला कांही सुचेना! अशा स्थितींत बाइलमाणूस अतिशय गोंधळते, त्याप्रमाणे सुनन्दाहि गोंधळली. सगळ्या घरभर ती इकडून तिकडे वणवण फिरूं लागली. मध्येच ती दिवाणखान्यांत बसे; मध्येच उठून पुनः येरझारा घालूं लागे. मधुनमधून टेलिफोनचा 'रिसीव्हर' हातीं घेई; आणि मनांत कांहीं विचार किंवा कल्पना आल्यामुळे पुनः तो जागच्या जागीं ठेवून देई.

किती तरी वेळ सुनन्दाचा असा कार्यक्रम सुरू होता.

अलिकडे बहुधा दररोजच श्रीकान्त बऱ्याच रात्री घरीं येई. तो येईपर्यंत सुनन्दा मालूच्या बिछान्यापाशीं जागत बसलेली असे. एकादें चांगलेसें पुस्तक हातीं आले, तर तें वाचीत एखाद्या दिवशीं आपल्या बिछान्यावरहि ती पडे.

कालहि सुनन्दा असेच एक पुस्तक वाचीत पडली होती. घड्याळांत ठणठण असे बारांचे ठोके पडले,

सुनन्दा एकदम चमकून उठून उभी राहिली, आणि खिडकीजवळ येऊन रस्त्याकडे दूरवर पाहूं लागली. परंतु कोणीच कुठें दिसेना! तेव्हां निराश होऊन खिन्नमुखानें परत येऊन ती आपल्या बिछान्यावर वाचीत पडली.

वाचतां वाचतां हळुहळू जणूं तिचे डोळे जडजड होऊन शेवटीं मिटले. किती वेळ तिला झोप लागली होती कोण जाणे! सुनन्दाला कसलें तरी वाईट, भयप्रद स्वप्न पडलें, आणि त्याच्या धसक्यानें ती एकदम तंद्रींतून जागी झाली.

सुनन्दा एकदम धडपडून उठून बसली, आणि तिनें घड्याळाकडे पाहिलें.

एक वाजून पंचवीस मिनिटें झालीं होतीं. तरीहि श्रीकान्ताचा अजून-कोठें पत्ता नव्हता!

पतिराजांना घरीं यावयाला इतकी रात्र पूर्वीं कधींच झाली नव्हती. त्यामुळें सुनन्दाला आतां चांगलीच हुरहूर लागून राहिली. कां—कां इतका स्वारीला आज उशीर?

सुनन्दा पुनः खिडकीजवळ येऊन उभी राहिली, आणि कोण कुठें दिसतें काय, याचें ती निरीक्षण करूं लागली.

तितक्यांत सुनन्दाच्या मनांत एक कल्पना चमकून गेली. मघांशींच पतिराज कदाचित् आले असतील, आणि त्यांनीं 'माळू'ला हांका मारल्या असतील; दरवाजाच्या कडीचा खडखडाटहि केला असेल. इकडे आपणाला तर अगदीं मरणाची गाढ झोंप लागलेली! तेव्हां आपणाला कुणी आंतून जबाब देत नाहीं, किंवा दरवाजाहि उघडीत नाहीं, असें पाहून शेवटीं निरुपाय होऊन स्वारी व्हरांड्यांत बाहेरच—

मनांत कल्पना येतांच सुनन्दानें व्हरांड्याच्या दरवाजाजवळ येऊन तो एकदम उघडला. आशेनें प्रफुल्ल झालेल्या दृष्टीनें तिनें इकडे तिकडे पाहिलें.

परंतु कोणीच कुठें नव्हतें! चहूंकडे शान्त स्तब्ध होतें. त्यांनीं पाळलेला

रंग्या बोका मात्र चटकन् पायऱ्या चढून वर आला, आणि सुनन्दाच्या पायांना अंग घासून लाडीगोडी लावूं लागला.

व्हरांड्यांत कोणीच नव्हतें. तर मग आपले पतिराज, आंतून कुणी हांक देत नाहीं असें पाहून, रागावून परत फ्लोराच्या घरीं निघून गेले ?

किंवा कदाचित्—कोण जाणे काय झालें असेल तें ! निरनिराळ्या बऱ्यावाईट शंकाकुशंकांनीं सुनन्दाच्या हृदयांत नुसता कल्लोळ मांडला ! मालकीणबाई आपल्याच तंद्रींत गुंग आहेत असे पाहून, रग्या त्यांना खूष करण्याचा नाद सोडून हळूच आंत गेला. श्रीकान्ताचें ताट तेथे नेहमीं-प्रमाणें वाढून ठेवलेले होते. त्यांतील कांहीं खाद्य—पेय पदार्थ आपल्या तावडींत सांपडतात कीं काय, हे पहाण्याचा तो प्रयत्न करू लागला.

रंगोबाचा हा रागरग भांडीं वाजल्यामुळें सुनन्दाच्या लक्ष्यांत आला. ती तशीच धांवत आली, आणि रगोबांना एक नाजूक लत्ताप्रहार करून तिनें तेथून दूर हांकलून दिलें.

नतर पुन्हां ती परत आली. आणि मोठ्या दरवाजाच्या चौकटीला धरून उभी राहून कोणी कोठें दिसते काय, हे ती दूरवर दृष्टि देऊन पाहूं लागली.

पतिराजांचें प्रेम आपणावर आतां बिलकूल राहिलेलें नाहीं, हें सु-नन्दाला चांगले ठाऊक होते. वेळोवेळीं तीही त्याच्याशीं भांडायला कमी करीत असे, असेंहि नाहीं. तरीहि श्रीकान्ताच्या वाटेकडे आशेने डोळे लावून त्याचें ताट वाढून ठेवून, ती दररोज रात्रीं जागत बसत असे. आपल्यासाठीं आपली बायको दररोज जागत बसते, हें श्रीकान्तालाहि ठाऊक होतें. घरीं यावयाला त्याला उशीर होत असे, हें खरें; परतु घरीं आल्याशिवाय मात्र आजवर तो कधींहि राहिला नाहीं.

पतिराजांनीं अशा रीतीनें आपणाला भयंकर काळजींत कधींहि टाकलें नव्हतें—तर मग आजच असे काय झाले ?

दारुण चिंतेमुळें सुनन्दाच्या मस्तकाच्या चिंधड्या उडायची वेळ आली !

इतक्यांत दुरून एक टॅक्सी येतांना सुनन्दाला दिसली. तिचें हृदय आनंदानें एकदम भरून आले.

तिनें एकदम घाईघाईनें दरवाजा बंद केला, आणि झोंपायच्या खोलींत येऊन ती आपल्या बिछान्यावर बसून दरवाजाच्या कडीच्या कडकडाटाची वाट पाहूं लागली. आपल्या मनाची स्थिति श्रीकान्ताच्या ध्यानांत यावी, अशी सुनन्दाची सुतराम् इच्छा नव्हती. श्रीकान्त आपली अवहेलना करतो, तर आपणहि जशास तसे या रीतीनेच त्याच्याशीं वागतों, असेंच तिला त्याला दाखवायचे होते.

शिवाय, कदाचित् ती राक्षसीण, कवटाळीण फ्लोराही पतिराजांच्या बरोबर आली असेल! आपणाला पतीची वाट पहात दरवाजाशीं उभी असलेली पाहून फ्लोरा विजयानन्दानें हसेल! ते सहन करणे तर आपणाला कधींहि शक्य नाहीं, अशी सुनन्दाची खात्री होती!

परंतु तिच्या आकांक्षापूर्तीला किंवा विचारतरंगांना मुळींसुद्धां अवकाश न देतां, ती टॅक्सी येऊन सुनन्दाच्या घरावरून भर्रकन् पुढे निघून गेली—थांबली नाहीं!

सुनन्दाच्या हृदयांत कसेंसेच होऊं लागून तिच्या डोळ्यांना टच्कन् पाणी आले. ती पुनः बिछान्यावरून उठली, आणि बाहेर गेली.

याप्रमाणे अस्थिर मनानें, क्षणांत आंत आणि क्षणांत बाहेर अशा सुनन्दाच्या येरझारा होऊं लागल्या. तरीही श्रीकान्ताचा कुठें पत्ता नाहीं!

याप्रमाणें सुनन्दाचा कार्यक्रम सुरू असतां हळुहळू पहांट झाली, आणि झुंजुमुजू दिसूंहि लागलें.

तिला वाटूं लागलें, आपल्या कल्पनेप्रमाणें, रात्रीं श्रीकान्त येऊन दरवाजा न उघडला गेल्यामुळें जर कदाचित् कंटाळून फ्लोराकडे गेला असेल, तर तो आतां तरी परत आल्यावांचून रहाणार नाहीं!

या कल्पनेनें तिनें झटपट चूल पेटवून दहापांच पुऱ्या तळून काढल्या, आणि कांद्याबटाट्यांचा रस्साहि स्टोव्हवर चढविला. कुणाला ठाऊक, श्रीकान्ताला काल कदाचित् सणसणीत उपासहि पडला असेल! म्हणून

घरीं येतांच, त्याच्या फराळाला थोडीसुद्धां खोटी होऊं नये म्हणून, तिनें गरमागरम फराळाचे पदार्थ अगदीं तयार करून ठेवले.

परंतु तरीहि श्रीकान्त आला नाहीं !

आता मात्र सुनन्दा घाबरली. परंतु काय करावें, हे तिला सुचेना.

हळुहळू श्रीकान्ताची दररोजची ऑफिसची वेळहि टळून गेली, तरीहि त्याचा कुठं पत्ता नाहीं !

सुनन्दाचे माहेर मुंबईच्या जवळच—ठाण्याला होतें. तिचा बाप थोड्याच वर्षांपूर्वीं निवर्तला असून, मोठा भाऊहि तिला नव्हता. तिची आई मात्र तेथें असून एक धाकटा भाऊ तिला होता. तो तेथल्या हाय-स्कूलमध्यें मॅट्रिकच्या वर्गांत होता. आलेल्या किंवा येऊं पहाणाऱ्या संकटाची बातमी ताबडतोब माहेरीं देणे हे सुनन्दाच्या बाबतींत तरी कठीण होतें, आणि बातमी कळविण्यापासून फारसा फायदाहि होण्यासारखा नव्हता. कारण, तिला या सकटांत साहाय्य करील, असे तिच्या माहेरीं कोणीच नव्हतें !

शेजारीं, नामजोशांच्या घरीं मात्र सुनन्दाला थोडीफार मदत खात्रीनें मिळण्यासारखी होती. परंतु त्या साहाय्याच्या याचनेमुळें आपलें गृहच्छिद्र मात्र उघडे होण्यासारखें असून, पतीची व आपली बदनामी त्यामुळे होण्याचा फार संभव होता. तशाच मायेच्या आंतड्याशिवाय कढ कुणाला येणार ?

इतक्यांत सुनन्दाला एका आश्रयस्थलाची एकदम आठवण झाली. तें ठिकाण म्हणजे तिचा आतेभाऊ श्रीपादराव देसाई याचें.

श्रीपादराव हे मुंबईच्या पोलिसखात्यांत लॅमिंग्टन् रोड स्टेशनवरचे इन्स्पेक्टर होते. ते सुनन्दाच्या वडिलांच्या घरींच लहानाचे मोठे झाले असून तिच्यावर त्यांचें अतिशय प्रेम असे. सुनन्दाहि त्यांना वडील भावाप्रमाणेंच मानीत असे.

बाहेरून आंत आणि आंतून बाहेर याप्रमाणे खेपा घालतां घालतां, सुनन्दाच्या मनांत कल्पना आली, कीं हा घोंटाळा श्रीदादाला कळवून

त्याला साहाय्य करण्याविषयीं विनंति करावी. या विचाराने फोनजवळहि ती गेली.

पण दुसऱ्याच क्षणीं तिला वाटूं लागलें, कीं कुणाला माहीत—पतिराजांची स्वारी या वेळीं फ्लोराच्या घरीं दारूबिरू झोंकून बेहोष पडली असली तर ? मग दादाला सर्व कांहीं कळून येऊन आपल्या फजितीला पारावार रहाणार नाहीं !

छेः ! दादाला फोन करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आणखींहि थोडा वेळ वाट पहावी ते बरें !

कोणी कितीहि चिंताग्रस्त असलें, तरी काळ कांहीं थांबत नाहीं ! हळूहळू एक वाजला. वेणीफणी, आंघोळ, जेवण वगैरे कांहीं न करतां सुनन्दा तशीच चिंताग्रस्त स्थितींत तळमळ तळमळ करीत होती. काय करावें, हे अजूनहि तिला सुचत नव्हते.

इतक्यांत बाहेरून कोणीं हांक मारली,

" कोण आहे घरांत ? भाऊसाहेब—श्रीकान्तराव आहेत ?"

क्षणार्धांत सुनन्दाच्या मनांत अनेक कल्पना चमकून गेल्या. ती चटकन् उठून खिडकीशीं गेली. एक फिटफाट पोषाख केलेला सुंदर तरुण बाहेर उभा होता.

दरवाजावर मृदु आघात करून पुनः त्याने हांक मारली,

" भाऊसाहेब–भाऊसाहेब—"

सुनन्दानें दरवाजा उघडला, आणि किंचित् बाजूला होऊन ती म्हणाली,

" घरीं नाहींत—"

" घरीं नाहींत ! म्हणजे ?"

तो तरुण आश्चर्यानें उद्गारला, आणि नमस्कार केल्यासारखें करून मृदु स्वरानें म्हणाला,

" मी भाऊसाहेबांच्या ऑफिसांतच आहें. त्यांच्याच हाताखालीं मी काम करतों. माझ्याशीं संकोच धरण्याचं कांहीं कारण नाहीं,

वहिनीसाहेब ! भाऊसाहेब मला आपला धाकटा भाऊच समजतात, इतकं त्यांचं माझ्यावर प्रेम आहे. माझं नांव सदानन्द संजगिरी—"

कांहीं न बोलतां सुनन्दाने त्याच्याकडे एक वेळ पाहिले. या वेळी तिच्या मस्तकांत विचारांचा नुसता कल्लोळ उडाला होता !

चार दोन क्षण थांबून सदानन्दानें विचारलें,

" भाऊसाहेब घरीं नाहींत ? आतां काय करावं ! गेले तरी कुठं ? आः !"

त्याच्या या उद्गारांचा सुनन्दाला अर्थ कळेना ! ती आश्चर्यानें उद्गारली,

" म्हणजे ?—ऑफिसांत नाहीं जायचं ? "

" नाहीं—ऑफिसांत ते आज आलेच नाहींत !"

सुनन्दा भयशंकेने अक्षरशः स्तंभितच झाली ! तिनें आंवढा गिळून विचारलें,

" मुळीं जायचंच नाहीं ? म्हणजे ?"

" नाहीं—ऑफिसांत ते मुळींच आले नाहींत आज ! मग आहेत कुठं ते ?"

सुनन्दा खिन्न स्वरांत म्हणाली,

" घरीं तर कालपासून यायचच नाहीं ! "

" म्हणजे !" सदानन्द अत्यंत आश्चर्यानें उद्गारला. " कालपासून भाऊसाहेब घरींच आले नाहींत ? ऑफिसांतून घरीं आलेच नाहींत ?"

" नाहीं—काल नेहमींप्रमाण दहा वाजतां जें ऑफिसांत जायला झालं, तें अजूनपर्यंत मुळीं घरीं येणंच झालं नाहीं !"

पराकाष्ठेच्या विस्मयानें सदानन्द म्हणाला,

"मोठं आश्चर्य आहे बुवा ! कालपासून घरीं आलेच नाहींत, याचा अर्थ तरी काय ? म्हणजे मोठा कठीण प्रसंग आहे ! निरोपाबिरोपहि नाहीं कांहीं पाठविला ? "

मान हलवून विषण्ण मुखानें सुनन्दा म्हणाली,

" नाहीं—निरोपहि नाहीं. मीच सारखी वाट पहातें आहें !"

एकादी गोष्ट सांगावी न सांगावी अशा विचारांत माणूस असावा, तसा सदानन्द दिसला. पांच सात क्षण स्तब्ध राहून तो म्हणाला,

" तर मग मोठ्या पंचायतीची गोष्ट आहे, वहिनीसाहेब ! मोठा घोंटाळा झाला आहे !"

भयानें एवढीशी होऊन सुनन्दा उद्गारली,

" घोंटाळा ! कसला घोटाळा, सदानन्दराव ?"

" काल असं झालं, वहिनीसाहेब !" सदानन्द सांगू लागला, " सुमारं तीनएक वाजतां दुपारीं भाऊसाहेब बॅंकेतून बारा हजार रुपये घेऊन बाहेर पडले. बॅंकेची ती रक्कम कुणालाशी पोचती करायचं काम मॅनेजरनं त्यांच्यावर संपविलं होतं."

"बारा हजार रुपये रोख !" सुनन्दा भयानें उद्गारली.

" हो—बारा हजार रुपये रोख—म्हणजे नोटांत ! रक्कम पोचती करून भाऊसाहेब ऑफिसांत परत यायचे, ते काल आले नाहींत—मघांपर्यंत आजहि नाहींत ! त्यामुळं ऑफिसांत मोठी चलबिचल उडाली आहे ! मॅनेजरसाहेबांना वाटतं आहे, की भाऊसाहेब ती रक्कम घेऊन पार पसार झाले ! म्हणजे बॅंकेची ती रक्कम त्यांनीं चोरली ! पोलिसांत खबर द्यावी, अशी ऑफिसांत वाटाघाट चालली आहे. परतु माझा कांहीं या कल्पनेवर मुळींसुद्धां विश्वास बसत नाहीं, वहिनीसाहेब ! भाऊसाहेबांचा तो स्वभावच नाहीं—त्यांच्या मनांतसुद्धां असली गोष्ट येणं शक्य नाहीं. मला आपलं असं वाटल, कीं काल ऑफिसांतून गेल्यानंतर ते एकाएकीं कशानं तरी भयंकर आजारी बिजारी पडले असावे, अन् त्यामुळं असा हा विलक्षण घोंटाळा झाला असावा ! म्हणून साहेबांना सांगून अन् थोडं थांबवून मी त्यांच्या समाचाराला म्हणून हा आतां आलो. पण एवढी थोरली रक्कम—आपली न् त्यांची भेटच नाहीं म्हणतां कालपासून ! काय आतां कराव ! मोठा बिकटीचा प्रसंग येऊन ठेपला ! एकाद्या सोनेरी टोळीच्या किंवा गुंडाबिंडांच्या तडाक्यांत तर सांपडले नसतील भाऊसाहेब ?"

सदानन्दाच्या या बातमीनें सुनन्दाचा चेहरा खाड्कन् उतरला! सदानन्दाची कल्पना खरी नसून दुसराच कांहीं तरी 'प्रकार' असावा, अशी तिच्या मनाला हूरहूर लागून राहिली. याला तसेंच कारण होतें—

दोन तीन दिवसांपूर्वीं—आपण विलायतेला जात आहों, तेव्हां आपणाला सातआठ हजार रुपये उसने द्यावे, अशी श्रीकान्ताने आपणाजवळ मागणी केली होती, ही गोष्ट सुनन्दाला आतां आठवली.

सुनन्दाचा स्वतःचा असा थोडा संग्रह होता. तिच्या वडिलांनीं जें मृत्यूपूर्वीं रीतसर मृत्युपत्र केले, त्यांत त्यांनीं तिला रोख आठ हजार रुपये दिले होते. त्यांच्या मृत्युपत्राच्या व्यवस्थापकांनीं ते तिच्या नांवें इंपीरियल बॅंकेत ठेवून दिले होते. त्याशिवाय, श्रीकान्त यापूर्वी संसारखर्चाकरतां म्हणून तिला जे दरमहाच्या दरमहा पैसे देत असे, त्यांतून हात राखून वेळोवेळीं ती पोस्टाच्या सेव्हिंग्ज बॅंकमध्ये लहान लहान रकमा जमा करीत असे. ही रक्कमहि आतां दोन हजारांच्या घरांत गेली होती. अगदीं प्राणांवर बेतेपर्यंत या रकमांना शक्य तों हात लावायचा नाहीं, असा तिचा निश्चय होता. पैसे मागतांना आपल्या आकांक्षांचें आणि भावी कार्यक्रमाचें अतिशय रमणीय आणि सुंदर चित्र सुनन्दासमोर उभें करण्याचा श्रीकान्ताने आपणाकडून शिकस्तीचा प्रयत्न केला होता. बॅंकेची चालू नोकरी ही दुसऱ्याच्या मर्जीवर अवलंबून—अळवावरचे पाणी! पुढे कर्तबगारीलाहि फारसा तींत वाव नाहीं, तेव्हां आपण इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर होऊन येतो, असे त्याचे म्हणणे होतें. बॅंकेच्या नोकरीमुळें आपल्या थोरामोठ्यांशीं खूब ओळखी झाल्या असल्यामुळें आपली प्रॅक्टिस हां हां म्हणतां जमेल, आणि थोड्याच अवकाशांत मुंबईच्या बड्या लोकांत आपलं प्रस्थ जमेल, अशी श्रीकान्ताच्या त्या चित्राची सामान्य रूपरेखा होती. सुनन्दा ही त्याची अर्धांगीच असल्यामुळें त्याच्या भावी वैभवाची आणि समाजातील उच्च पदवीची तीहि भागीदारीण होणारच होती! श्रीकान्तानें त्या वेळीं बायकोसमोर अशीहि प्रतिज्ञा केली, कीं विलायतेहून आल्यानतर आपण फ्लोराशीं असलेला संबंध पार तोडून टाकूं! इंग्लंडमध्ये तिचे पुष्कळ आप्तमित्र असल्यामुळें आपणाला

तिचा तिकडे अतिशय उपयोग होणार आहे; आणि म्हणून तूर्त तिला आपण सोडूं शकत नाहीं, अशी स्वारीची या बाबतींत कैफियत होती. फ्लोराच्या या आप्तमंडळीची परदेशांत आपणाला निरनिराळ्या तऱ्हेनें अतिशय मदत होणार आहे, असे त्याने तिला पटवून देण्याचा खूब प्रयत्न केला.

परंतु पतीच्या आवेशपूर्ण वक्तृत्वाला किंवा त्यानें समोर धरलेल्या चित्राला सुनन्दा जरासुद्धां भुलली नाहीं. त्याच्या मनाची भावना खरोखर काय असावी, याचा तिला बराच अंदाज होता. बहुधा फ्लोराशीं संगनमत करून पतिराजांनीं नवीनच कांहीं तरी मनोरथाचा डोलारा उभारला असून त्यासाठीं पैशाची जरूर आहे, असा सुनन्दाला पुरा संशय आला होता.

मात्र श्रीकान्त खरोखर विलायतेला जाणार असेल, या गोष्टीवर तिचा मुळींसुद्धां विश्वास बसला नाहीं.

सुनन्दानें श्रीकान्ताला उत्तर दिले,

"ठीक आहे. नुसते आठ हजारच काय, पण माझं जें कांहीं आहे, तें सगळं मी आपणाला द्यायला तयार आहें. माझं आहे तें आपलंच आहे! पण फ्लोराचा संबंध आपण संपूर्णपणं सोडला आहे, अशी ज्या दिवशीं माझ्या मनाची पुरी खात्री होईल, त्या दिवशीं मी आपणाला पैसे देईन. त्याच्यापूर्वीं एक पैसादिखील माझ्या-कडून मिळायची आपण आशा करूं नये. आपण कांहीं म्हटलं तरी आतां त्यावर माझा भरंवसा बसायचा नाहीं!"

यावर श्रीकान्त कांहींच बोलला नाहीं.

सदानन्दानें जी हकीकत सांगितली, तीवरून सुनन्दाच्या मनाला अतिशय भय वाटूं लागलें. तर मग काय, ऑफिसचे बारा हजार रुपये लुंगावून पतिराज खरोखरच विलायतेला पसार तर झाले नाहींत? मॅने-जर तर पोलिसांत खबर द्यायला तयार झाले आहेत!

पतिराजांना पोलिसांनीं गिरफदार केलें तर? भयकंपित हृदयानें आणि साश्रु नयनांनीं सुनन्दानें फोनकडे पाहिलें.

सदानन्द कांहीं वेळ गप्प होता. नंतर तो म्हणाला,

"बरं तर, वहिनीसाहेब, मी जातों आतां. भाऊसाहेब आले तर त्यांना एकदम ऑफिसांत टेलिफोन करायला जरूर सांगा. कारण, आमचे मॅनेजरसाहेब मोठे माथेफिरू आहेत—खरोखरच ते पोलिस-मध्यें केस गुदरतील! आम्ही ऑफिसांतील सारी मंडळी भाऊसाहेबां-बद्दल अतिशय काळजींत आहों. अन् आपणहि—आपला चेहरा कसा अगदीं सुकून गेला आहे! डोळेहि लाल झाले आहेत. नुसती काळजी करून काय होतं, वहिनीसाहेब? आंघोळ करून दोन घांस खाऊन घ्या. होणार असेल ते व्हायचंच—तें कांहीं चुकणार नाहीं. संध्याकाळीं पुन्हां एक वेळ येऊन मी समाचार घेऊन जाईन हं—"

असें म्हणून सदानन्द निघून गेला.

सुनन्दाची कमर खचून ती कोचावर पडली.

परंतु कांहीं वेळानें कंपित हृदयानें आणि कांपणाऱ्या पायांनीं ती उठून फोनजवळ गेली, आणि तिनें रिसीव्हर उचलला.

## दहा .... .... .... .... पतिव्रतेचें सर्वस्व!

“ अलाव! कोण आहे?”

“यस् ( हं )—कोण हवं आहे आपणाला?”

“ लॅमिंगटन् रोड स्टेशन का?”

“ हं—कोण हवं आहे आपणाला?”

“ देसाई—इन्स्पेक्टर देसाई. आहेत का ऑफिसांत? असतील तर मेहेरबानी—”

“ आहेत—थांबा हं जरा—आणतो त्यांना बोलावून—”

मिनिट दोन मिनिटांनीं पुनः फोनवर संभाषण सुरू झालें—

“ हं—अलाव—मी आहे, इन्स्पेक्टर देसाई. कोण आपण?”

“ मी—मी, सुनन्दा मुजुमदार—तुझी इंदुताई, दादा!”

“ कोण? इंदुताई—ताई! इंदू!”

“ दादा, दादा, लवकर—अगदीं लवकर ये रे! मोठ्या संकटांत आहें मी—”

“ काय ग, काय, घोटाळा तरी काय आहे, इंदुताई? मालू तर बरी आहे? भाऊसाहेब—का—कुणी आजारी का आहे, ताई?”

रडत रडत सुनन्दा फोनवर म्हणाली,

“ नाहीं रे—आजारीबिजारी कुणी नाही. पण तू तावडतोब असशील तसा धांवत ये. मोठं—अतिशय मोठं संकट आहे रे! धावत—अगदीं धांवत ये, दादा!”

“ इंदू, वेडे, रडते का आहेस तूं? हं—रडाबिडायचं नाहीं अं कांहीं असलं तरी. अगदीं—मुळींच भिऊं नकोस तूं. हा मी आलोंच बघ. दोन मिनिटांतच येतों—थांब—अरे जमादार—”

रिसीव्हर जोरानें जागेवर ठेवून सुनन्दा मागें परतली, आणि कोचावर पडून अवसन्न मनानें आणि देहानें स्फुंदस्फुंदून रडूं लागली.

अल्पावधींतच एक टॅक्सी धडधडत येऊन दरवाजाशीं थांबली, आणि श्रीपादराव वाऱ्याच्या जबरदस्त झोताप्रमाणें धांवतच आंत येऊन थडकले.

इकडे तिकडे झटकन् नजर टाकून सहानुभूतीच्या स्वरानें ते म्हणाले,

" काय ग, काय एकंदर घोटाळा आहे ? झालं आहे तरी काय, ताई ?"

पदरानें अश्रु पुसून, त्यांचा निरोध करण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत सुनन्दा उठून बसली. दादाकडे पहातांच तिला पुनः जोरानें रडूं कोसळलें.

तिच्याजवळ बसून प्रेमळ, मृदु स्वराने श्रीपादराव म्हणाले,

" अगदीं रडायचं नाहीं बरं का, इंदु ! बरं, सांग अगोदर, काय झालं ?"

" मोठ्या संकटांत सांपडले आहे रे मी, दादा ! काय रे करूं मी आता ?"

असे म्हणून सुनन्दा अधिकच स्फुंदूं लागली.

श्रीपादराव घोंटाळ्यांत पडले. संकट कांहीं तरी जबरदस्त आहे, याची त्यांना चटकन् जाणीव झाली. त्यांनीं मृदु स्वरानें पुनः प्रश्न केला,

" काय झालं ? सांग ना मला ! नुसतं रडून कसं बरं चालेल ? ताई, कसलं संकट ग ? कांहींच नाहीं ध्यानांत येत माझ्या. पोरगी तर तिथं बेश खाशी झोपली आहे. भाऊसाहेब कुठं आहेत ? ऑफिसांत असतील ? "

मान हलवून रडत रडत सुनन्दा म्हणाली,

" नाहीं रे—ऑफिसांत नाहींत—"

" तर मग कुठं गेले आहेत ? "

" तेंच तर नाहीं बाबा, कळत ! कालपासून मुळीं घरीं यायचंच नाहीं ! संकट म्हणून मी म्हणतें तें हेंच—हेंच, दादा !"

श्रीपादराव अतिशय आश्चर्यांत पडले, ते म्हणाले,

" कालपासून घरींच नाहीं आले ? मुळींच ?—"

" नाहीं रे ! काल सकाळीं नेहमींप्रमाणं ऑफिसांत दहा वाजतां जायचं, पण यायचंच नाहीं अद्याप ! "

क्षणभर थांबून श्रीपादराव गंभीरपणें म्हणाले,

" सगळी हकीकत अगदीं इत्थंभूत साग बरं मला, इंदुताई ! "

सुनन्दानें हळूहळू, रडत रडत, सर्व हकीकत श्रीपादरावांना सांगितली.

फ्लोराची हकीकत, मद्यपानापर्यंत मजल पोंचल्याची हकीकत, पैशाच्या तंगीपायीं होणारी संसाराची ओढाताण, वारंवार घरांत उडणाऱ्या झगड्या–भांडणांची हकिकत, विलायतेला जाण्याकरतां आपणाजवळ केलेल्या पैशांच्या मागणीची हकीकत, त्यानंतर ऑफिसांतील सदानन्द संजगिरीच्या तोंडून नुकतीच ऐकलेली बॅंकेच्या पैशांच्या अफरातफरीची हकिकत—इत्यादि सर्व कांहीं गोष्टी बहिणीच्या तोंडून ऐकल्यानंतर मान हलवून श्रीपादराव अतिशय गभीरपणे म्हणाले,

" छे छे छे ! प्रकरण इथपर्यंत भलतंच भडकलं असतां तूं मला एका अक्षरानं कांहीं कळवलं नाहींस, इंदु ? "

सुनन्दा खाली मान घालून मोठा थोरला सुस्कारा सोडून म्हणाली,

" कसं रे कळवूं, दादा ? "

" म्हणजे ? " श्रीपादराव आश्चर्यानें उद्गारले.

" या सगळ्या घाणेरड्या अन् मान खालीं घालायला लावणाऱ्या गोष्टी तुला मी कळवूं तरी कोणत्या रे तोंडानं, दादा ? तुला कळवून उपाय करायला सांगावं, असं किती किती तरी वेळ माझ्या मनांत आलं असेल; पण बोलायला जीभच धजेना ! छीः ! किती वाईट—वाईट सारं हें ! पण आतां वाटतं, कीं तुला सारं मीं कळविलं असतं, तरच बरं झालं असतं ! "

बहिणीकडे पाहून मस्तक हलवीत श्रीपादराव म्हणाले,

" छेः ! मोठी चूक केलीस तूं, इंदुताई ! भयंकर बावळटपणा करून बसलीस अगदीं ! अग, भलत्याच बाबतींत लाज अन् जननिंदेची परवा करणं ठीक नाहीं. अगदीं भयंकर परिणाम होतात ना असल्या चुकीचे !

अगोदरच मला जर तूं हा सारा प्रकार कळविला असतास, तर इतक्या र मीं प्रकरण भडकू दिलंच नसतं ! मुळांतच घाव घालून सगळं कांहीं बरोबर करून टाकलं असतं ! छे छे छे ! पोरी—भलतीच चूक केलीस ! "

कांहीं वेळ स्तब्ध बसून सुनन्दा म्हणाली,

" बरं, झालं ते झालं—होऊन गेलं; पण आतां काय करतां येईल तें सांग ! "

" खरोखर हे विलायतेला गेले असतील का रे, दादा ? काय वाटतं तुला ? अन् बँकेचे हे पैसे ? त्यामुळं तुरुंगबिरुंग तर नाहीं येणार कपाळीं ? "

श्रीपादराव कांहीं वेळ विचारांत स्तब्ध बसले होते. नंतर ते गंभीर-पणें म्हणाले,

" खरंच ताई ! मोठी कठीण अन् बिकटीची वेळ आहे. पैशांची अफरातफर झाली अस जर सिद्ध झालं, तर तो प्रसंग येणारच ! इंग्रजांच्या राज्यांत माणूस पळून जाऊन जाणार कुठं, ताई ? "

सुनन्दा पुनः स्फुंदूं लागली. चार दोन क्षणांनीं ती रडत रडत म्हणाली,

" दादा, दादा ! सुदैवानं तूं पोलिसांत आहेस. या बहिणीकडे पहा, अन् तिकडे तुरुंगांत जाऊं देऊं नकोस. तसं जर कांहीं झालं, तर मी तुला खात्रीनं सांगते, दादा, कीं विष खाऊन मी प्राण देईन ! वांचव रे दादा,—कसहि करून त्यांचं रक्षण कर. सांग, सुरक्षित रहातील ना रे ते ? दादा, दादा—तुझ्या मी पायां पडतें—"

सुनन्दाच्या पाठीवरून हात फिरवीत श्रीपादराव सान्त्वनपर शब्दांनीं म्हणाले,

" छीः छीः रडू नकोस, इंदुताई ! मुळींच रडूं नकोस. रडून फायदा काय तें सांग मला. आल्या संकटाला धीरानं तोंड दिलंच पाहिजे ! रडून उलट घात मात्र होईल ! काय उपाय करावा, याचाच [illegible] विचार

करतों आहे मी मघांपासून. पैशांची भरपाई करून जर कशा तरी रीतीनं—"

सुनन्दा उठून सरळ बसली. तिला एकदम धीर वाटूं लागला. तिनें उत्सुकतेनें विचारलें,

"होईल कांहीं उपाय तसं करून ? आतां जर पैसे दिले—तर—तर—"

तिच्याकडे पहात श्रीपादराव म्हणाले,

"प्रयत्न केला, तर मला वाटतं, संकट टळण्याचा बराचसा संभव तरी निदान आहे. पण बारा हजार रुपये!—इतकी रक्कम तुला मिळणार कुठून, ताई ?"

सुनन्दा उल्हासानें म्हणाली,

"आहे—मजपाशीं एवढी रक्कम आहे, श्रीदादा! बाबांनीं वुइल करून आठ हजार रुपये मला दिले आहेत, हे ठाऊकच आहे तुला! हेच रुपये तर मागत होती स्वारी त्या दिवशीं माझ्याजवळ!"

"ठीक—पण कुणाच्या नांवानं अन् कुठं आहे रक्कम ?"

"माझ्याच नांवानं बँकेंत आहे—"

"कुठल्या बँकेत ? भाऊसाहेबांच्या तर नाहीं ?"

"नाहीं—इंपिरियल बँकमध्यें आहे. ट्रस्टींनीं परस्पर त्याच बँकेंत जमा केली माझ्या नांव! त्याशिवाय पोस्टल बँकेंत दोनएक हजार रुपये आहेत माझे. हे झाले दहा हजार. माझे दागिनेहि मी देतें, ते विकून दोनएक हजार रुपये येतील, नाहीं दादा ? मिळून—"

श्रीपादरावांनीं मध्येच सुनन्दाला थांबवून म्हटलें,

"असूं दे; त्यांची आतांच नाहीं गरज लागायची. माझी आहे पुंजी, तिच्यांतून बाकी काय लागेल तें घेऊन मी रकमेची भरती करीन. तूं अगोदर मला ताबडतोब तुझीं बँकेचीं पासबुकं आणून दे बघूं. अन्—हो पण, पैसे काढायचे फॉर्म आहेत तुझ्याजवळ ?"

"आहेत—मीं आणूनच ठेवलेले असतात—"

"—मग त्यांवर झटपट सही दे करून—वेळ नाहीं—"

सुनन्दा झटकन् उठली, आणि आंत जाऊन दोन तीन मिनिटांच्या आंतच बॅंकांचीं पास-बुकें आणि पैसे काढावयाचे 'वुइथड्रॉअल फॉर्म्स' घेऊन आली. फॉर्म्सवर सह्या वगैरे करून पास-बुकें आणि फॉर्म्स तिनें दादाजवळ दिले.

श्रीपादराव जावयाकरतां उठले.

सुनन्दानें त्यांना पुनः आठवण केली,

"बघ अं, दादा! जेलबील कांहीं होतां नये तिकडे! काय वाटेल तें कर—"

श्रीपादराव मान हलवून किंचित् हंसून म्हणाले,

"त्याबद्दल तूं कांहीं काळजी नको करूं आतां, इंदुताई! काय वाटेल तें करून मी एकंदर शक्य तितकी स्थिरस्थावर करून टाकतों. पण आतां मुळींदिखील रडायचं नाहीं अं, वेडाबाई! नाहीं तर बघ इथल्या इथं टाकून जाईन मी सगळं. भाऊसाहेबांचा शोधहि ताबडतोब लावायला हवा. हो, बरी झाली आठवण—त्या गोऱ्या पोरीचा घरचा पत्ता ठाऊक आहे तुला?"

"हो, आहे—डेझी व्हिला, मरिन लाइन्स—"

"ठीक—"

असें म्हणून श्रीपादरावांनीं तो पत्ता आपल्या नोट-बुकांत झटकन् टिपून घेतला, व सुनन्दाकडे पाहून मृदु स्वराने ते म्हणाले,

"काय ग पण तुझी दशा झाली ही, पोरी! कालपासून न्हाण-खाण-पिणं कांहीं नाहीं असं वाटतं मला—हो ना? वेडी! तर मग भाऊ-साहेबांपेक्षां तुझ्यामुळच घोंटाळ्यांत पडावं लागणार आहे आम्हाला, असं दिसतं. हं, अगोदर तर मग आंघोळ करून दोन घांस खाऊन घे बघूं—मी हा आलोंच बघ सारं ठाकठीक करून—"

सुनन्दा करुण दृष्टीनें दादाकडे पहात गद्गद स्वरानें म्हणाली,

"तूं सगळी व्यवस्था लावून परत आल्याखेरीज मला खाणंपिणं कसं रे सुचेल, दादा? मन माझं अगदींच हे होऊन गेलं आहे, त्याला मी

तरी काय रे करूं ! तूं जाऊन आलास, अन् सगळं कांहीं ठीक असल्याची बातमी आणलीस, म्हणजे मगच मी खाईन—"

" वेडी ! बरं, नुसता चहा तरी घे तोंवर—मी येतों अं—काळजी नको करूं—"

असें म्हणून श्रीपादराव निघून गेले.

आपला श्रीदादा असातसा नाहीं, अतिशय हुषार पोलिस अधिकारी आहे, बोलल्याप्रमाणें करण्याची तो शिकस्त करील, हे सुनन्दाला चांगलें ठाऊक होतें. तरी पण माणसाचे मन ! कट्टा वैरी चिंतणार नाहीं, अशा गोष्टी तें चिंतीत असतें !

सुनन्दाच्या विचारभ्रमणाला पुनः जोराने सुरुवात झाली; आणि त्याबरोबरच आंतून बाहेर आणि बाहेरून आंत तिच्या येरझाराहि सारख्या सुरू झाल्या.

तिला कांहीं सुचेना ! विचार करतां करतां तिच्या मस्तकाच्या चिंध्या होण्याची वेळ आली. वारंवार तिला रडूं कोसळत होतें, आणि डोळे पुसतां पुसतां तिला पुरेवाट होत होती.

तिची नजर एकसारखी घड्याळाकडे लागून राहिली होती.

वेळ चाललाच होता. तीन वाजले; तरी श्रीपादराव आले नाहींत !

साडेतीन झाले. दादाची वाट पहात सुनन्दा खिडकीजवळ आतुरतेनें उभी होती. तरी श्रीपादरावांचा पत्ता नाहीं !

जसजसा वेळ जाऊं लागला, तसतसें सुनन्दाच्या हृदयांत कसेंसेंच होऊं लागलें. मस्तकांतहि जणूं कुणी हातोडीचे घाव घालीत आहे, असें तिला वाटत होतें.

आणखीहि कांहीं वेळ गेला. तरीहि श्रीपादरावांचा पत्ता नाहीं !

चार वाजून चाळीस मिनिटें होत आहेत, तोंच एक टॅक्सी धडधडत येऊन दाराशीं उभी राहिली. सुनन्दा धांवतच व्हरांड्यांत गेली.

श्रीपादराव खालीं उतरले, अणि ड्रायव्हरला थांबावयाला सांगून पायऱ्या चढून वर आले. त्यांचा चेहरा प्रसन्न दिसला.

सुनन्दाजवळ येऊन ते उल्हसित स्वरानें म्हणाले,

" बातमी एकंदरींत चांगली आहे, इंदुताई ! "

तीव्र जिज्ञासेच्या दृष्टीनें सुनन्दा दादाकडे पाहूं लागली.

तीं दोघें व्हरांडयांतून आंत दिवाणखान्यांत आलीं. तसेंच कोचा-वर बसून श्रीपादराव म्हणाले,

" ऑफिसचा घोंटाळा तर पुरा मिटवून आलों मी, इंदु ! "

कृतज्ञ दृष्टीने दादाकडे पाहून गद्गद स्वरानें सुनन्दा म्हणाली,

" खरं ? तुझ्या तोंडीं साखर पडो, दादा ! "

" आतां तुला बिलकुल काळजी करायला नको, इंदुताई ! " श्रीपादराव म्हणाले. " भाऊसाहेबांना आतां तुरुंगाची तर भीति नाहींच; पण नोकरीहि त्यांची जात नाहीं ! "

" कसं काय केलंस तूं हें, दादा ? सांग ना रे ! माझा गुणांचा दादा ! "

सुनन्दाच्या सद्गदित कंठांतून शब्द फुटेना !

" भाऊसाहेबांच्या ऑफिसांत जाऊन मी पहातों, तर मॅनेजर पोलि-सांत खबर द्यायच्या अगदीं बेतांत होता. मॅनेजरच्या कुणा मित्राच्या खात्यांतून बारा हजार रुपये काढून ते त्याला पोंचते करायला भाऊ-साहेबांना त्यानं काल सांगितलं होतं. मॅनेजरला भेटून त्यांच्यापुढं रकम ठेवून माझा परिचय करून देऊन मीं त्याला म्हटलं, ' मिस्टर मुजुमदार आहेत माझे मेहुणे. काल ऑफिसांतून बाहेर पडून ते रस्त्यावरच्च अस-लेल्या आपल्या घरीं जाताहेत, तोंच त्यांच्या हातीं एक अर्जंट टेलिग्राम (जरूरीची तार) पडला. त्यांचा एक अगदीं जवळचा नातेवाईक मद्रासला मरणापन्न स्थितींत असून शेवटच्या भेटीला त्यांना त्यान बोलावलं होतं. त्या वेळीं मद्रास एक्स्प्रेसला अगदीं थोडा अवकाश असल्या-मुळं त्यांना आपणाला कळवून रजाहि घेतां आली नाहीं, किंवा पैसेहि परत करतां आले नाहींत. सुदैवानं मी त्या वेळीं बहिणीला भेटायला त्यांच्याकडे गेलों होतों. तेव्हां माझ्यापाशीं पैसे देऊन ते आपणाकडे पोंचते करायला मला सांगून, ते ताबडतोब एक्स्प्रेस पकडायला गेले.

परिस्थितीचं महत्त्व ध्यानीं आणून आपणाला क्षमा करावी, अन् एक आठवड्याची रजा मंजूर करावी, अशी आपणाला आग्रहपूर्वक विनंति करायलाहि मला मुजुमदारांनीं सांगितलं आहे. खरं म्हटलं तर, काल अशक्य असलं, तरी आज सकाळीं आपणाला मीं या बाबतींत येऊन भेटायचं; पण तितक्यांत एका खुनाच्या घोंटाळ्यांत मी सांपडलों! तव्हां, कसं तरी करून हा मी आपणाला येऊन भेटतो आहे—क्षमा करा—' काय, इंदुताई ? ”

इंदुताई कृतज्ञतेनें दादाकडे पाहून म्लानपणें हंसली.

“ आहे ना मी पोलीस-ऑफिसर ? ” असें म्हणून श्रीपादराव मोठ्यानें हंसले, व पुढें सांगूं लागले, “ मॅनेजर कांहीं अगदींच वाईट माणूस नाहीं, असं मला आढळून आलं. माझ्या कहाणीवर त्याचा विश्वास बसला. भाऊसाहेबांना एका आठवड्याची रजाहि त्यानं मंजूर केली, अन् माझा हात धरून तो म्हणाला, ‘ आपण मोठ्या संकटांतून माझी सुटका केली, इन्स्पेक्टरसाहेब ! मिस्टर मुजुमदारांनीं माझा विश्वासघात करून मला फसवलं, अशी मनाची धारणा करून घेणंहि मला अत्यंत यातना देत होतं. कारण, ते अतिशय विश्वासू, सत्प्रवृत्तीचे, अन् आपल्या कामाला पूर्णपणं योग्य आहेत, असाच माझा पहिल्यापासून विश्वास आहे.' बरं, इंदुताई, हीं तुमचीं पासबुकं बँकांचीं. सगळे पैसे तुझ्या खात्यांतून न काढतां मीं थोडेथोडे ठेवून दिले आहेत. एकदम अकाउंट क्लोज ( खाते बंद ) करण ठीक नाहीं. माझ्या पुंजींतून बाकी जरूर लागली ती रक्कम मीं घेतली भरतीला काढून—”

“ किती रे, दादा ? ” उल्हासित मुखानें सुनन्दानें प्रश्न केला.

श्रीपादराव हंसत हंसत म्हणाले,

“ तुला काय करायचं आहे त्याच्याशीं ? तें भाऊसाहेब अन् मी बघून घेऊं ! ”

सुनन्दा दादाकडे कृतज्ञतेच्या दृष्टीनें पहात म्हणाली,

“ अन् तिकडची कांहीं बातमी ? कांहीं शोध लागला का ? ”

" तेंच मी तुला सांगणार होतों—" श्रीपादराव पुढें म्हणाले. " बँकेंतून मी तसाच मरिन लाइन्सवर त्या बयेच्या बंगल्यावर गेलों. तिथल्या दोघांतिघांचा मिळून एकच दरवान आहे. त्याच्यापाशीं मीं तिची चौकशी केली. पण तो बेटा पक्का बदमाष ! मला पहिल्यानं दादच देईना फारशी ! पण माझ्या पोलिशी इग्यामुळं अन् माझ्या या इन्स्पेक्टरच्या पोषाकाचं जबर वजन पडून त्यान खरी हकीकत मला सागितली. तिथल्या तिथं गिरफदार करून न्यायचं त्याला भय घालतांच तो माझ्या पायां पडून म्हणाला, 'मेमसाहेबांनीं सांगायचं नाहीं, म्हणून बजावल्यामुळं पहिल्यानं मीं सागितलं नाहीं.' त्याच्या सांगण्यावरून कळलं, कीं काल रात्रींच्या मद्रास मेलनच भाऊसाहेब त्या बयेला घेऊन मद्रासला गेले. कोलंबोवरून विलायतला जायचा त्यांचा बेत असावा, असंहि त्याच्या बोलण्यावरून मला कळलं. मद्रासला तें जोडपं चारदोन दिवस राहून मग कोलंबोला जाणार आहे म्हणे ! लगेच या दुसऱ्या उद्योगाला मी लागलों. कोलंबोहून इंग्लंडला जाणारी बोट या एकवीस तारखेपूर्वी नाहीं, असं चौकशींत मला कळलं—तेव्हां थोडं बरं वाटल मनाला. म्हटलं, आहे थोडा अवकाश ! बरं, इदुताई, मी जातो आतां—नीट सांभाळून रहा अं—"

" जातोस तूं ? कुठं पण, दादा ?"

" कुठ म्हणजे ? मद्रासला. आज रात्रींच्या मेलन मला आतां मद्रासला निघालंच पाहिजे. इथून मी असाच ऑफिसांत जाऊन एका आठवड्याची रजा घेतों साहेबाकडून. तसाच घरीं जाऊन जरूरीच्या कामाबिमांची व्यवस्था लावतों न् निघतों मेलनं. भाऊसाहेबांना पकडल्यावांचून आतां आपला शेवटपर्यंत निभाव लागायचा नाहीं. ते आले नाहींत, तर आपला सारा व्यूह फुकट जाऊन ऑफिसांत खऱ्या हकीकतीचा तेव्हांच बभ्रा होईल ! माझ्या पदरीं खोटेपणा न् मानहानि येऊन मी मोठ्या पेचांत पडेन. बरं ताई, जातो मी आतां—काय होईल तसतसं मी तुला पत्रानं कळवीनच. पण बघ हं—अगदीं—"

सुनन्दा त्यांना मध्येंच थांबवून अनुनयाच्या स्वरानें म्हणाली,

"दादा, दादा, मलाहि घेऊन चल रे बरोबर—"

"कुठं ? मद्रासला ?—वा !"

"त्यांत काय झालं ? येतेच मी तुझ्याबरोबर ! अशा स्थितींत एकसारखी भयंकर काळजी करीत एकटी तरी इथं कशी राहूं रे मी, दादा ? येतेच मी—अं ?"

थोडा वेळ विचारांत स्तब्ध राहून श्रीपादराव म्हणाले,

"तूंहि येतेस ? बरं, चल. आलीस तर एका अर्थी तेवढं बरंच होईल. पण अजून तूं कांहीं जेवलीबिवलीस नाहीं ! सैंपाक करून तूं जेवणार कधीं, तयारी करणार कधीं, नृ माझ्याबरोबर येणार कधीं ? बोलूनचालून बायकांचा कारभार तुमचा ! चेंगट अगदीं—कधीं वेळेवर आटोपायचं नाहीं—"

"नाहीं रे, दादा ! पांच मिनिटांत माझी तयारी होईल बघ—"

"म्हणजे, खायचंप्यायचं कांहीं नाहीं, होय ?" श्रीपादराव हंसून म्हणाले. "म्हणजे झीटबीट येऊन तुम्हीच करा मध्येंच घोटाळा !"

"ना—नाहीं रे—"

"तर मग माझं म्हणणं कबूल असेल, तर तुला नेतों बरोबर मी. जेवण उरकायचं अं ? चार कपडेच घे बरोबर—अशीच माझ्याबरोबर चल पोरीला घेऊन घरीं माझ्या. तिथं माझ्याबरोबरच बाकी सगळी व्यवस्था करतो मी—"

जरा थांबून सुनन्दा म्हणाली,

"ठीक आहे—"

पंधराव मिनिटांच्या आंत मालूला घेऊन सुनन्दा श्रीपादरावांबरोबर निघाली.

## अकरा .... .... .... भयंकर कपाळदुखी !

मद्रासला पोंचतांच ‘मॅजेस्टिक’ नांवाच्या मोठ्या सुप्रसिद्ध हॉटेलांत श्रीकान्त आणि फ्लोरा ही जोडी उतरली.

फ्लोरानें आपल्या ऑफिसांतील ‘मित्रा’च्या साहाय्यानें, दोघांचेहि पासपोर्ट, फर्स्ट क्लासच्या दोन तिकिटा वगैरे सर्व विलायतेच्या प्रवासाची व्यवस्था जय्यत केली असून, अशा आपल्या भावी पराक्रमी अर्धांगी-बद्दल श्रीकान्ताला अतोनात अभिमानहि वाटत होता. सर्व सामानसुमान वगैरे फ्लोरानें अगोदरच आपल्या एजंट–कंपनीच्या स्वाधीन केलें असून फक्त दोघांचे जुजबी सामान तेवढे त्यांच्याबरोबर होतें.

संध्याकाळीं दोघेंहि आपल्या खोलींत, नेहमींप्रमाणें बाहूंत बाहू अडकावून, अगदीं जवळजवळ बसलीं होतीं. मुंबईहून निघाल्या-पासून त्या प्रणयी युग्माचें एकसारखें प्रेमगुंजन चाललें होतें. गप्पा—गप्पा—गप्पा ! आजहि त्या कपोत–कपोतींचे गुंजनच चालले होते !

इंग्लंडच्या प्रवासाच्या रमणीय कालाची स्वप्नमय कल्पना करण्यांत श्रीकान्त अगदीं तल्लीन होऊन गेला होता.

फ्लोरा मुद्दामच खोडसाळपणे हंसून म्हणाली,

“काय रे शिरी, आपल्या बायकोला न् मुलीला सोडून होममध्ये रहायला तुला बरं तरी वाटेल का ? का तिथं गेल्यावर एकाद्या मुला-सारखा त्यांच्या आठवणीन रडू लागशील तूं ?”

सुनन्दाचें तें सात्त्विक, तेजःपुंज, पण करुण मुखकमल, ते सजल विज्ञप्तिपूर्ण विशाल काळेभोर डोळे क्षणार्धांत श्रीकान्ताच्या मानसनेत्रां-समोर तरळूं लागून, त्याच्या हृदयाला थोडा कां होईना, पण प्रेमकारु-ण्याचा ओलावा आल्यावांचून राहिला नाहीं. त्याबरोबरच लहानग्या निरागस मालूचें कोमल, सुंदर, तेजस्वी मुखमंडलहि त्याला दिसूं लागून मनाचा द्रव अधिकच वाढला !

परंतु हे किती ? पांच दहा क्षणच! लगेच अंगाशीं अंग भिडवून बसलेल्या फ्लोराच्या रूपयौवनमय एकोणीस वसन्तांच्या तीव्र आणि धवल मादकतेमुळें तो अगदीं मोहान्ध होऊन गेला!

कृत्रिम, पण उन्मादी स्मिताने प्रफुल्ल झालेलें प्रियेचें मुखमंडल हृदयाशीं धरून तिच्या सोनेरी केशपाशावरून मृदुपणे हात फिरवीत श्रीकान्त उद्गारला,

"आय् डोन्ट केअर अ स्ट्रॉ फॉर देम, डार्लिंग! इट्स् यू, माय गर्ली, हूम आय् केअर, आय् थिंक्, ड्रीम अँड आय् वॉट विदिन मी! (प्रिये, त्याची मला बालाग्रहि परवा नाहीं वाटत! पोरी, जिचं मी चिंतन करतो, जी माझ्या स्वप्नांतहि विहरते, अन् माझ्या हृदयांत जी सदासर्वदा असावीस वाटतं, ती तूं, तूं—तूंच आहेस!)"

फ्लोरानें अतिशय मधुर हास्य करून आपलें अमृतानें भरलेलें बिंबारक्त ओष्ठयुग्म वरती केले.

दोघेहि कांहीं क्षण स्तब्ध होते. नंतर श्रीकान्तानें विचारलें,

"त्या पहिल्या दिवशींची गोष्ट तुला आठवते का ग, कुस्मी?"

मुद्दाम आठवल्यासारखें करून कुसुमिकाने प्रश्न केला,

"कोणत्या दिवसाची रे, कॅन्ट?"

"अग, पहिल्याच दिवसाची! त्या दिवशीं तुझी माझी पहिल्यानंच अगदीं भेट झाली—समुद्राकिनाऱ्यावर—"

कृत्रिम कोपकटाक्ष फेंकून फ्लोरा मान वेळून म्हणाली,

"वा! बराच आहेस कीं रे तूं, शिरी!"

श्रीकान्त घाबरून म्हणाला,

"काय—काय ग, सुमा! झालं तरी काय माझ्या हातून?"

"आणखीन् मलाच विचारतोस उलट? असला स्मरणीय दिवस का मी विसरेन!"

मुक्ततेचा सुस्कारा टाकून किंचित् हंसून श्रीकान्त म्हणाला,

"ओ—अस्सं! म्हटलं, झाला तरी काय अपराध माझा! अन् तो दुसराहि—अत्यंत महत्त्वाचा दिवसहि कधीं तूं विसरशील का, डार्लिंग?

ज्या दिवशीं रात्रीं हवा खायला आपण टॅक्सी करून सींवच्या एकान्त खाडीवर गेलों, अन् तूं माझी—अगदीं माझी झालीस!"

फ्लोरा हंसून प्रसन्न स्वरानें म्हणाली,

"त्याच दिवशीं कां, डियरी? त्याच्यापूर्वीं किती तरी दिवस मी तुझी—केवळ तुझीच झाले होतें—"

श्रीकान्त प्रेयसीचे चुंबन घेऊन म्हणाला,

"ते खरं—पण त्या दिवशींच तर पहिल्यानं तें मला कळून आलं—नाहीं का?"

"हो, असं म्हणायला हवं खरं. पण एकदम याच गोष्टीचीशी आठवण मला तू दिलीस, शिरी? काय बरं झाल असं?"

श्रीकान्त हसून म्हणाला,

"कांहीं घाबरायला नको, भित्रे पोरी! तसं कांहीं झाल नाहीं. त्या दिवसाची स्मृति मला अतिशयच प्रिय वाटते. अशा स्वर्ग-सुखाच्या वेळीं ती आठवण मला झाली, तर त्यांत काय नवल आहे?"

कृतककोपाने ती तन्वगी म्हणाली,

"अस्सं! म्हणजे, हल्लींचे आपले प्रेमप्रसंग अगदींच तुच्छ वाटतात अं तुला?"

फ्लोराच्या कपोलाला अंगुलीनें मृदु स्पर्श करून श्रीकान्त हंसून म्हणाला,

"छे छे! त्याच्या अगदीं उलट! ते तर मला अधिकच रम्य अन् मधुर वाटतात, कुसुमा! अन् ज्या भविष्यकालाबद्दल आपण बेतबात रचून ठेवले आहेत, तो जर कल्पनेप्रमाण आपणाला पुढं प्रत्यक्षांत उतरवितां आला, तर तो म्हणजे अगदीं मधुरतम अन् रम्यांतला रम्य ठरणार आहे! काय, कुसुमी! नाहीं तुला वाटत असं?"

मान हलवून प्रेमळ, स्निग्ध स्वराने फ्लोरा म्हणाली,

"इट वुड बी सिंपूली नेक्टर इटसेल्फ! (तें म्हणजे प्रत्यक्ष अमृतच!) तूं कोर्टांत बॅरिस्टरी करशील, खोऱ्यानं पैसे ओढशील—सुंदर बंगला, बगीचा, नोकरचाकर—चैन—बस्स! मी तुला रोज रोज मोटारींतून कोर्टांत

पोंचवीन, अन् संध्याकाळीं आणायला जाईन. हाउ स्वीट इट इज टु थिंक् ऑफ् ऑल् धिस्! (आः! या सगळ्याची नुसती कल्पना करणं-दिखील किती गोड आहे!)"

त्या दिवशीं फ्लोरा एकटीच शहरांत बराच वेळ कामानिमित्त फिरली. बरीच रात्र झाल्यावर ती हॉटेलमध्यें परत आली.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं फ्लोरा आणि श्रीकान्त ब्रेकफास्ट (न्याहारी)-ला बसलीं होतीं.

टोस्टचा एक तुकडा तोंडांत घालतां घालतां श्रीकान्त म्हणाला, "आः! आणखीं चारच दिवस, कुसुम! नंतर कोलंबोला आपण बोटींत बसणार! तेव्हांपासून पूर्ण स्वातंत्र्य अन् स्वर्गसौख्य! आः!"

मान डोलवीत फ्लोरा म्हणाली,

"हो! चार दिवसांनीं ते निधान आपल्या हातीं येणार—"

"ओः! चार—दिवस—आणखीन् चार—दिवस! हिंदुस्थान सुटायला आणखींन् निदान दोन दिवस तरी पाहिजेत! तुला खरं खरं मनचं सांगायचं, कुस्मी, तर इथं राहायला माझं मन कसं ते घेत नाहीं पहा! मनाला क्षणोक्षणीं भय वाटत, कीं शोध लागून ते जर आले—"

फ्लोरा त्याच्याकडे चमत्कारिक दृष्टीने पहात विस्मयानें म्हणाली,

"कुणाची गोष्ट बोलतो आहेस तूं?"

श्रीकान्ताने फ्लोराच्या कानाशीं तोंड नेलें, व तो मृदु स्वरानें म्हणाला,

"पोलिस, फ्लोरा! तुला तर ठाऊकच आहे, डार्लिंग, कीं हे बारा हजार रुपये मीं कांहीं सरळ मार्गानं मिळविलेले नाहींत. आमचे मॅनेजर-साहेब पोलिसांत खबर दिल्याशिवाय रहाणार नाहींत. अन् मग पोलीस आमचा माग काढीत इथं आले तर?"

फ्लोरा हंसत हंसत म्हणाली,

"तर आणखीं काय दुसरं होणार? तुझ्या हातीं हातकड्या पडतील!"

श्रीकान्ताचें तोंड अगदीं सुकून गेलें, आणि त्याचा चेहरा खाड्कन् उतरला !

" हातकड्या पडतील ! मग तुरुंग—तुरुंग ! काय भयंकर—अंगावर शहारे उभे राहिले बघ माझ्या ! तुझ्या प्रेमाच्या मोहांत मशगुल होऊनच तर फ्लोरा, मी एकदम हे भयंकर काम करून बसलों ! आणखीन् महिना-पंधरा दिवस तर तूं सबूर करतीस, जर खात्रीनं एकाद्या सदुपायान मी हवी ती रक्कम—"

त्याला थांबवून फ्लोरा मध्येच हसून म्हणाली,

" ते मला ठाऊक आहे, शिरी ! माझ्या प्रेमासाठीं तूं हे धाडस केलंस, अन् काय वाटेल तें करशील, माझी खात्री आहे अगदीं ! मीं केवळ तुझी थट्टा केली हो, शिरी ! उगीच मनाला कां लावून घेतोस ? कांहींदिखील भ्यायचं कारण नाहीं तुला. आपण कुठं जातो ते फक्त एक आपल्या दरवानाला कळलं आहे. त्याला खूब बक्षीस देऊन अन् पुढंहि द्यायची लालूच दाखवून मीं त्याचा बदोबस्त केला आहे. प्राण गेला तरी तो कुणाला आपला बेत अन् ठिकाणा सांगणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. पोलिसला शोध लागला, तरी ते काय, मुंबईहून निघणाऱ्या बोटींमध्ये शोध करणार—यासाठीं तर असा उलटा रस्ता धरून कोलंबोवरून जायचं ठरवल मीं. आता मद्रासमध्ये चार दिवस आपण येऊन राहिलो, हे जरा धाडसाचं झालं खर. पण अगोदर कोलंबोला जाऊन तरी काय करणार होतो आपण ? इथं माझीं कामं तरी होतील. तूं अगदीं भिऊ नकोस, शिरी ! पोलिसच्या बापाला आपला शोध लागायचा नाहीं—त्याच्या आधींच आपण पार ! "

श्रीकान्त उद्विग्नतेनें म्हणाला,

" ते खर—पण माझ्या मनाला कशी भयंकर हुरहुर लागून राहिली आहे, सुमी ! आज इथूनच रंगूनला एक बोट सुटणार आहे, तिन आपण रंगूनला गेलो तर ? तुझी कांहीं हरकत नसेल, तर जाऊं या ना आपण त्या बोटीनं रंगूनला. मग तिथून जाऊ पुढं कोणत्या तरी मार्गानं लंडनला—"

फ्लोरा कांहीं वेळ विचार करून गंभीरपणें म्हणाली,

" खरं विचारशील, तर माझ्याकडून कमलीच हरकत नाहीं. पण आतां त्या बोटींत आपणाला सीट्स् कशा मिळणार आयत्या वेळीं ? खटपट करायलाहि अवकाश राहिला नाहीं आतां. आपलं सामानसुमानहि कोलंबोला रवाना झालं आहे. तें असो म्हणा---जाईल पुढं तें लंडनला---मिळेल तिथं---पण वेळ कुठं आहे ? शिवाय, माझी तब्बेतहि आज बरी नाहीं, शिरी ! "

श्रीकान्त अतिशय अस्वस्थ होऊन म्हणाला,

" काय---काय ? प्रकृति बरी नाहीं तुझी ? म्हणजे---अगोदर कांहीं नाहीं बोललीस ती तूं ! काय, होतं आहे तरी काय सुमी, तुला ? "

" भारी डोकं दुखत आहे रे ! "

" अरे अरे ! मोठी मुष्किलच म्हणायची ! हॉटेलच्या डॉक्टरला आणूं बोलवून, कुस्मी ? "

असें म्हणून श्रीकान्त जावयालाहि निघाला.

शुष्कपणे हंसून फ्लोरा म्हणाली,

" डोन्ट गेट नर्व्हस, शिरी ! ( उगीच घाबरूं नकोस ! ) तुला वाटतं आहे तितकं भयकर खरोखरच कांहीं नाहीं. असल्या दुखण्याला डॉक्टर कशाला ? त्यापेक्षां कोलनवॉटरनंच बरं वाटेल मला. डॉक्टरला बोलावण्यापेक्षां माझं एक काम कर ना, मनी ! करतोस ? "

" वा: ! काय हे विचारणं ! तुझं वाटेल तें काम करायला एका पायावर तयारी आहे माझी ! बोल---काय करूं ? "

" आज सकाळींच एक टेलिग्राम आला आहे मला---माझी एक मैत्रीण मिसेस् कॅरोल येते आहे मद्रासला. माझ्या वतीनं तिला स्टेशनवरून जर तूं घेऊन येशील---"

"कोणत्या गाडीनं येते आहे ती ?"

" नऊ अन् दहांच्या अशा दोन गाड्या आहेत. बहुधा ती नवांच्या गाडीनं येईल. तरी पण दोन्ही गाड्यांच्या वेळीं शोध घेतलेला बरा ---"

श्रीकान्तानें हातावरील घड्याळाकडे पाहून म्हटलें,

" हे तर वाजले साडेआठ; तर मग मी जाऊं स्टेशनवर ? "

" हं, जा हं—शिरी ! मेनी मेनी थँक्स ! ( भारी आभारी आहें मी ! ) पण मिसेस् कॅरोलला तर पूर्वी तूं कधीं बघितलं नाहींस. मग ओळखणार कशी तूं तिला ? बाई अशी किडकिडीत, पण चेहरा फार सुंदर आहे. साधारणपणं ' मॉव्ह ' रंगाचा पोषाख करणं तिला आवडतं— भारी चपळ आहे ती—"

श्रीकान्त हंसून म्हणाला,

" अन् या खुणांवरून जर ती मला ओळखली नाहीं, तर तिच्या लगेजवरून तरी ओळख पटेल ना मला तिची ? नांव असेलच त्यावर तिचं ' मिसेस् कॅरोल ' असं—"

फ्लोराने हंसून त्याला शाबासकी देत म्हटलें,

" क्लेव्हर बॉय ! ( हुषार पोरगा आहेस खरा तूं ! ) डोकं दुखत असल्यामुळं मी स्टेशनवर येऊं शकलें नाहीं, हे नीट सांग हं तूं तिला. वाईट वाटूं देऊं नको म्हणावं—"

" वा ! हें का तूं मला सांगायला पाहिजे ? "

असें म्हणून श्रीकान्त बाहेर जात होता. इतक्यांत मागें परतून तो म्हणाला,

" तुला वर पोंचवून येऊं का, सुमी ? "

" नको—थॅंक्स ! मी स्वतः जाऊं शकेन—"

श्रीकान्त निघून गेला.

चहाचे घोट घेतां घेतां फ्लोरेटचा चेहरा आनंदोत्फुल्ल झाला. ब्रेकफास्ट पुरा करून ती तावडतोब वर निघाली.

## बारा .... .... .... .... .... प्रेम-देवता

श्रीकान्त स्टेशनवर वेळेवर पोंचला.

नवांची गाडी पांच मिनिटे उशिरां आली. परंतु तींत फ्लोरानें सांगितलेल्या खाणाखुणा पटतील अशी एकहि युरोपियन स्त्री नव्हती. प्रत्येक युरोपियन पॅसेंजरच्या लगेजवरील लेबलें त्याने लक्ष्यपूर्वक पाहिलीं. परंतु 'मिसेस् कॅरोल' हे नांव त्याला कोठेंच आढळले नाहीं. या गाडीला ती आली नाहीं—पुढील गाडीला तरी येईल, या आशेने तो स्टेशनवर बसून राहिला.

तो एक तास श्रीकान्ताला भारी कंटाळवाणा गेला. परंतु करणार काय? वल्लभेची आज्ञा!

दहांची गाडी अगदीं बरोबर वेळेवर आली. परंतु तीतहि श्रीकान्ताला मिसेस् कॅरोल आढळली नाहीं! तो हताश झाला!

नवांच्या गाडीने एक युरोपियन तरुण गृहस्थ आला. त्याच्या चेहऱ्याकडे पहातांच, त्याला कुठे तरी पाहिले असावें, असा श्रीकान्ताला भास झाला. पण तो जवळ येतांच तत्क्षणी त्याची त्याला ओळख पटली.

"ओः! हा तर क्रप!" श्रीकान्त हंसत हंसत उद्गारला,

"हॅलो, मिस्टर क्रप! गुड् मॉर्निंग! (ओः! मिस्टर क्रप अं! नमस्कार!)"

क्रंप थोडासा चमकल्यासारखा झाला. परंतु तसे दिसूं न देण्याचा शक्य तो प्रयत्न करून तोहि हंसत हंसत उत्तरला,

"गुड् मॉर्निंग, मिस्टर मुज–मुजमुडार! काय खबरबात? आपण दोघहि उत्तम आनदांत अन् मजेत आहां ना?"

मान डोलवून श्रीकान्त आनंदानें हंसत हंसत म्हणाला,

"हो—खात्रीनंच! पण आपण इकडे कुठ मद्रासला एकाएकीं?"

कपाळाला एक दोन आंठ्या घालून क्रॅप म्हणाला,

" कांहीं जरूरीच्या कामासाठीं आलों आहें—आपण स्टेशनवर कुणाची वाट पहात आहां अस दिसतं!"

जरा इकडे तिकडे पाहिल्यासारखें करून श्रीकान्त म्हणाला,

"हं—एका बाईंना उतरून घ्यायला आलो आहे मी—"

"मिस् टेम्पलच्या आशेनं, यांत शंकाच नाहीं?" क्रॅप हंसत हंसत म्हणाला.

" हो—असं खरं! बरं, मुक्काम किती दिवस इथं?"

क्रॅप जरा गडबडल्यासारखा दिसला. क्षणभर थांबून तो म्हणाला,

" ते कांहीं सांगतां येत नाहीं. पण कदाचित्—मी इथूनच—"

नंतर घड्याळाकडे पाहून तो घाईने म्हणाला,

" बरं, वेळ नाहीं मला—गुड् बाय देन! (बर तर, नमस्कार!)"

" यस्, गुड्-लक्!"

क्रॅप निघून गेला. मागे वळून तो उपहासपूर्वक हंसला काय?

श्रीकान्त प्लॅटफॉर्मवर येरझारा घालूं लागला.

पुढल्या गाडीला 'मॉव्ह' रंगाचा पोषाक केलेली एक साधारण किडकिडीत आणि सुंदर तरुणी उतरली खरी; परतु तिचे लगेज कांहीं नव्हते. ती उतरताच इकडे तिकडे पाहू लागली.

श्रीकान्ताला वाटले, बहुधा हीच मिसेस् कॅरोल असावी.

ती पुढे येतांच, टोपी काढून तिला अभिवादन करून श्रीकान्त हंसत हंसत म्हणाला,

" गुड् मॉर्निंग, मॅडम! आर यू लुकिंग फॉर मिस् फ्लोरा टेम्पल? (नमस्कार, बाईसाहेब! आपण मिस् फ्लोरा टेम्पलला शोधतां आहां का?)"

तरुणी विस्मयाने उद्गारली,

" हू इज शी (कोण आहे ती)?"

श्रीकान्त ओशाळल्यासारखा होऊन म्हणाला,

" ओ, एक्स्क्यूज मी (क्षमा करा मला)! मला वाटतं, माझी

चूक झाली. तिच्या वतीनं मी मिसेस् कॅरोल नांवाच्या बाईची वाट पहातों आहे. मला वाटल, कीं आपणच बहुतकरून मिसेस कॅरोल असाल."

तरुणी स्मितपूर्वक म्हणाली,

"नो, सॉरी! (नाहीं—वाईट वाटतं!—मी नव्हे ती बाई!"

श्रीकान्ताचे मन विषण्ण झाले. मिसेस् कॅरोल तर मग काय आलीच नाहीं? परंतु ती आली असून, आपणच तिला ओळखले नसलें तर! ती जर तशीच एकटीच हॉटेलकडे निघून गेली, तर केवढा अनर्थ होईल! मग काय आपल्या फजितीला पारावार आहे? फ्लोराला तोंड दाखवायला तरी मग जागा आहे का आपणाला?

छीः! एका बाईला शोधून काढण्याचे साधें कामहि आपणाला करता येऊं नये?

सर्व उतारू निघून गेल्यावर, फ्लोराला आतां काय कैफियत गुदरावी, याबद्दल मनाशीं भवति न भवति करीत श्रीकान्त हॉटेलमध्ये परत आला.

ड्रॉइंग-रूम (दिवाणखान्या)मध्ये फ्लोरा त्याला आढळली नाहीं. तसाच तो झोपण्याच्या खोलींत आला. तेथेंहि ती नव्हती!

श्रीकान्त मोठ्या काळजींत पडला! आजारी असता ही गेली तरी कोठे? लायब्ररी(वाचनालया)मध्ये जाऊन वर्तमानपत्रेंचित्रे तर वाचीत बसली नाहीं?

तो लायब्ररीकडे निघाला.

हॉटेलचा एक नोकर जिन्याने वर येत होता; श्रीकान्ताला खालीं येतांना पाहून तो अंमळ बाजूला सरला. फ्लोराच्या दिमतीला असलेला नोकर तो हाच, हे त्याने ओळखलें.

चिंतातुर स्वराने श्रीकान्ताने त्याला विचारले,

"तेरा नबर कमराका मेमसाब किधर गिया, बोल सकता?"

नोकर सलाम करून म्हणाला,

"बाहार गया, हुजूर!"

"बाहार?"

" हां, हुजूर! एकठ्ठा साहिब भेट करने आया था—उनको साथ—"

श्रीकान्ताच्या कपाळाला आंठ्या पडून भुंवया वक्र झाल्या. कोण हा साहेब आलेला? स्टेशनवर क्रंप आपणाला नुकताच भेटला, ही गोष्ट चटकन् त्याच्या मनांत आली.

त्यानें त्या नोकराला साहेबांच्या खाणाखुणा विचारल्या; त्याच्या-कडून जीं उत्तरें मिळालीं, त्यावरून हा साहेब क्रम्पशिवाय दुसरा कोणी नव्हे, अशी श्रीकान्ताची खात्री झाली.

पण हा आहे तरी काय घोटाळा? आपण फ्लोराला भेटायला येणार आहों, असें क्रप तर आपणापाशीं बोललाहि नाहीं! आणि प्रकृति ठीक नसतां, फ्लोराहि त्याच्याबरोबर भटकायला जाते, याचा अर्थ काय?

श्रीकान्ताच्या मनांत कांहीं शंका येऊन त्याचा चेहरा काळा पडला!

इतक्यांत हॉटेलचा मॅनेजर कांहीं कामाकरतां वरतीं येत होता. श्रीकान्त अर्ध्या जिन्यावर निश्चलपणें उभा आहे, असें पाहून तो आश्चर्यानें उद्गारला,

" मिस्टर मुजुमदार, आपण नाहीं गेलां वाटतं? माझी कल्पना अशी होती, कीं मिस् टेम्पलबरोबर आपणहि रंगूनला गेलां असाल!"

श्रीकान्त त्याच्या या प्रश्नाने आश्चर्यस्तभितच होऊन गेला! डोळे कपाळांत चढवून विस्मयानें तो उद्गारला,

" रंगूनला! म्हणजे?"

" हो—रंगूनलाच—मिस् टेम्पलबरोबर—"

" म्हणजे? मिस् टेम्पल काय रंगूनला गेली?"

मॅनेजर श्रीकान्ताच्या चेहऱ्याकडे पहातच राहिला. त्यानें विचारलें,

" मोठं आश्चर्यच म्हणायचं! आपणाला नाहीं ठाऊक?"

" नाहीं—मी न् ती मिळून परवां इथून निघून कोलंबोला जाणार होतों, न् तिथून बोटीनं लंडनला—"

मॅनेजर आश्चर्यचकित होऊन म्हणाला,

" काय आपण म्हणतां हे मला कळत नाहीं, मिस्टर मुजुमदार ! मघाशीं एका घंट्यापूर्वी मिस् टेम्पलनीं आपलं दोघांचं बिल चुकतं केलं, अन् हॉटेल सोडून त्या निघून गेल्या. आजच्या अकरांच्या बोटीन त्या रंगूनला जायच्या होत्या, अन् त्यांच्या सामानसुमानाची वगैरे व्यवस्था मींच काल करून दिली. मला वाटलं, आपणहि त्यांच्याचबरोबर जाणार असाल. तर मग आणखी कांहीं दिवस इथंच आपला मुक्काम आहे वाटतं ? "

श्रीकान्तानें त्याला कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्याला आतां चांगलें आठवलें, कीं ' किती दिवस रहाणार ? ' म्हणून आपण प्रश्न केला असतां रूप खूब गोंधळला, आणि फ्लोराहि आतांच्या बोटीने रंगूनला जात असून तिने हॉटेलचें बिलहि चुकते केले—मॅनेजरनेच तिच्या प्रवासाची सारी व्यवस्था केली !

तर मग काय ?—श्रीकान्ताचा चेहरा पांढरा फटफटीत झाला !

दोन तीन मिनिटें तो किंकर्तव्यमूढ होऊन जागच्या जागीं—जिन्यांतच—उभा राहिला !

श्रीकान्ताने घड्याळाकडे पाहिले—दहा—शेहेचाळीस !

अकरा वाजतांची बोट, नव्हे ? अजून चौदा मिनिटे आहेत ती सुटायला !

एखाद्या वेड्यासारखा श्रीकान्त धाडधाड करीत जिना उतरला. एक दोन वेळ ठेंचाहि त्याला लागल्या; परंतु तिकडे लक्ष न देतां तो एकदम बाहेर आला.

इकडे तिकडे तो पाहतो, तो स्टॅंडवर तीन चार टॅक्सी होत्या. त्यांपैकीं एकीला खूण करून त्याने बोलाविले, व ती येतांच तींत तो धाडकन् चढून बसला.

डबल भाडें देण्याचा लोभ दाखवून त्यानें टॅक्सी बंदराकडे दामटीत न्यायला ड्रायव्हरला सांगितले.

* * *

श्रीकान्त बंदरावर पोंचतो तों काय? बोटीची शिडी काढली असून बोट शिटी देऊन हळुहळू सरत होती !

बोटीवरचे किती तरी उतारू डेकवर उभे राहून जवळच किनाऱ्यावर उभे असलेल्या आपल्या आप्त-मित्रांना उद्देशून रुमाल उडवून त्यांचा निरोप घेत होते.

पहिल्या वर्गाच्या केबिनजवळ एक युरोपियन तरुण जोडपे बाहुबद्ध होऊन कठाड्याशीं उभे होतें.

श्रीकान्ताने ते क्षणार्धांत ओळखले; तीं म्हणजे त्याची हृदयेश्वरी फ्लोरा आणि क्रप हीं होतीं !

श्रीकान्ताच्या हृदयांत जणूं कोणीं आरपार खंजीर खुपसल्यासारखें झाले ! त्या विषारी जखमेमुळे त्याच्या तोंडून छोटीशी आर्त किंकाळीहि बाहेर पडली !

त्या जोडप्याचीहि दृष्टि तितक्यांत श्रीकान्ताकडे वळली. तो दृष्टिला पडतांच फ्लोरा आणि क्रप यांनीं हसत हंसत रुमाल उडवावयाला सुरुवात केली !

वाऱ्याच्या प्रवाहाबरोबर त्या जोडप्याचा आनंदी कंठस्वर जणूं श्रीकान्ताला स्पष्ट ऐकूं येऊं लागला—

"रामराम ! मित्रा—रामराम !"

* * *

श्रीकान्त शून्य दृष्टीनें डेकवरील त्या जोडप्याकडे पहात राहिला. हा एकंदर प्रकार आहे तरी काय, हें अजूनहि त्याच्या कांहींसुद्धां ध्यानांत आले नाहीं !

फ्लोराच्या या अत्यंत विलक्षण, अगदीं अद्‌भुत अशा वागणुकीचें रहस्य काय ? हें सारे आपण स्वप्न तर पहात नाहीं ?

श्रीकान्ताने मागे वळून पाहिले, तो कांहीं अंतरावर हॉटेलचा चपराशी उभा असून आपणाकडेच पहात आहे, असें त्याच्या दृष्टीला पडले,

हळुहळू तो श्रीकान्ताजवळ येऊन सलाम करून म्हणाला,

"एकठा चिठ्ठी है, हुजूर!"

विमनस्कतेने त्याच्या हातून पत्र घेऊन श्रीकान्त निर्निमेष नेत्रांनीं धूर सांडीत दूर दूर जाणाऱ्या बोटीकडे पहात राहिला. बिचारा चपराशी कांहीं वेळ चिरीमिरीच्या लोभाने उभा होता. कांहीं क्षणांनीं निराश होऊन तो निघून गेला.

रूंप आणि फ्लोरा या ब्रह्मानदमग्न युग्मासह बोट हळुहळू दूरदूर जाऊन दिसेनाशीहि झाली. श्रीकान्ताच्या भग्न हृदयाच्या अगदीं अन्तर्भागाचें मंथन करून एक तप्त दीर्घ निःश्वास जोरानें बाहेर पडला.

आतां त्याचें लक्ष हातांतील लिफाफ्याकडे गेलें. वरचें अक्षर फ्लोराचे आहे, हे त्याने तत्काळ ओळखले.

अस्तंगत झालेल्या आशेचा शेवटचा क्षीण किरण एकदम उज्ज्वल झाला! कदाचित् आपणाला वाटते तसे नसेलहि; ज्या विलक्षण निःसीम प्रेमाचा आपण रात्रंदिवस, अष्टौप्रहर वर्षाव केला, तें अगदींच व्यर्थ जाईल काय? शक्य नाहीं! कदाचित् कांहीं अनिर्वचनीय गूढ कारणामुळें फ्लोराला एकाएकीं बोटीवर चढणे भाग पडलें असेल! कदाचित् तिला—

श्रीकान्तानें एकदम लिफाफा फोडला. त्यांतून एक लहानसे पत्र आणि एक छोटे रंगी कार्ड बाहेर पडलें.

पत्र असे होतेः—

"प्रिय मिस्टर मुजमुडार,

मी आणि हेनरी रंगूनला जात आहो, हें आपणाला कळणार, हें मला उघड दिसत आहे. तें कळतांच आपण आश्चर्यानें थक्कच होऊन जाल, यांतहि शंका नाहीं. परंतु यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं.

आपण मूर्तिपूजक हिंदु—जित जातीचे. मी भौतिकवादी जेतृजातीची, उच्च संस्कृतीची तरुणी! माझ्यासारख्या एका अत्यंत

अल्प परिचयाच्या तरुणीच्या रूपावर भाळून आपल्या प्रेमळ, पतिप्राण पतिव्रता विवाहित पत्नीचा कायमचा त्याग करायला आपण तयार झालांत ! आपल्यासारख्या पुरुषावर प्रेम करून मी आपणाशीं विवाह करायला तयार होईन, अशा आशेला आपल्या हृदयांत आपण स्थान दिलें, यासारखी मूर्खपणाची गोष्ट दुसरी कोणती असणार ?

आपणापाशीं मी कपटाने वागले, याबद्दल आपण मला क्षमा करा. तसें मला कां वागावे लागले, हे आपल्या ध्यानीं यायला कठीण पडूं नये, असें मला वाटते. बाकी आपण अतिशय भोळे, यांत शंका नाहीं. आम्ही कोलंबोवरून लंडनला जायचा कां बेत केला, मद्रासला कां आलो, चपराशालाहि ही बातमी मुद्दाम कां सांगितली, याचें कारण आतां तरी आपल्या लक्ष्यांत येईल, अशी आशा आहे.

माझें हेनरीवर पुष्कळ दिवसांपासून प्रेम जडले आहे. येत्या सतरा तारखेला रंगूनला आमचा विवाह होणार आहे. त्याची निमंत्रणपत्रिका सोबत आहे.

आपण आम्हांला जे साहाय्य केले, त्याबद्दल आम्ही दोघेहि आपली चिरकाल ऋणी राहूं, याबद्दल खात्री असावी. या साहाय्यबळावर आम्ही रंगूनला एक धंदा सुरू करणार असून तेथे सुखाने संसार करणार आहो. कधीं जर आपण रंगूनला आलां, तर आपण आमच्या आदरातिथ्याचें ग्रहण केल्यास आम्हांला आनंद होईल.

आपली चिरकृतज्ञ

**फ्लोरा टेम्पल.**

श्रीकान्ताने कांपणाऱ्या हातानें तें कार्डहि पाहिले—खरेंच, ती मिस् फ्लोरा टेम्पल आणि मिस्टर हेनरी क्रप यांच्या विवाहाची छापील निमंत्रणपत्रिका होती !

दुःख, निराशा, क्रोध, क्षोभ इत्यादि विकारांनीं श्रीकान्ताच्या हृदयांत नुसता कल्लोळ करून सोडला ! त्याचें सर्वांग थरथरूं लागलें. ज्या फ्लोराच्या पायीं आपण सुनन्दासारखी गुणांची खाण अशी धर्मपत्नी आणि मालूसारखी गोड मुलगी यांचा त्याग केला; प्रेम, स्नेह, मानसंमान यांवर—किंबहुना सर्वस्वावरच पाणी सोडलें, ती अशी पाषणाहृदयी राक्षसी ठरेल, अशी श्रीकान्ताची स्वप्नांतहि कल्पना नव्हती !

त्याचे मस्तक फिरू लागलें—सगळे जगच जणूं अंधारांत बुडत आहे, असे त्याला वाटूं लागले !

श्रीकान्त भोवळ येऊन खालीं पडत होता; इतक्यांत त्याला कोणीं मागून सांवरले.

त्याने विस्मयाने मागें वळून पाहिले—एक पोलिस अधिकारी !

तत्क्षणीं श्रीकान्ताची खात्री झाली, कीं आपल्या पापाचें प्रायश्चित्त मिळायला प्रारंभ झाला ! बँकेचे पैसे लुबाडण्याच्या अपराधानिमित्त आपणाला गिरफदार करून नेण्याकरतां मुंबईचे पोलिस आले आहेत !

आतां खटला—कोर्ट—शेवटीं तुरुंग !

श्रीकान्ताच्या मानसनेत्रांसमोरून तितक्यांत किती तरी नरकवासांतील भयकर देखावे दिसूं लागून त्याच्या सर्वांगावर भयाने कांटाच उभा राहिला !

परतु लगेच त्याने आपल्या मनाला सांवरून दृढ केले. गृहसंसाराच्या स्निग्ध, सुधास्रावी रम्य कौमुदीचा त्याग करून, आपण माळ–मैदानावरून वेताळाच्या चुडीच्या प्रकाशामागे धांवत सुटलो ! कोठून ती कुठे जात आहे, याचा क्षणभरदेखील कधीं थांबून तिळमात्र विचार केला नाही. मात्र आतां कृतकर्मांचें फळ आपणाला भोगणे अवश्यच आहे. तें आतां चुकवून चुकेल कसे ?

त्या पोलिस अधिकाऱ्याने श्रीकान्ताला हटकले,

"भाऊसाहेब—"

कंठस्वर श्रीकान्ताला ओळखीचासा भासला. त्याने नीट निरखून पाहिलें; तो खरेच ! आपले मेहुणे श्रीपादराव देसाई !

श्रीकान्ताने म्लानपणे हंसून हात पुढे केले, व म्हटले,

" कोण, श्रीपादराव? खरोखर नशीब माझ, म्हणून तुम्हीच मला पकडायला आलां! ठीक आहे—हा मी तयार आहे—"

श्रीपादराव कठोर स्वराने म्हणाले,

" पुरे करा ही पागलगिरी! टॅक्सींत चढा एकदम—"

जवळच एक टॅक्सी खडी होती. एकाद्या गरीब सालस मुलाप्रमाणे इन्स्पेक्टरसाहेबांच्या हुकुमासरसा श्रीकान्त मुकाट्याने खालीं मान घालून टॅक्सींत चढून बसला.

तत्क्षणीं श्रीपादरावांनी खूण केली, आणि टॅक्सी स्टेशनकडे निघाली.

श्रीकान्ताने सहज बाजूला वळून पाहिले, आणि तो विस्मयातिशयाने स्तंभितच झाला !

माल्लला मांडीवर घेऊन सुनन्दा पदरानें अश्रु पुशीत आहे, असे त्याच्या दृष्टीला पडले.

चार दोन क्षण निर्निमेष नेत्रांनी श्रीकान्त निःस्तब्धपणे सुनन्दाकडे पहातच राहिला. आपल्या या देवतातुल्य, प्रेमनिधान अर्धांगीशीं आपण जे पशुतुल्य—नव्हे, राक्षसी वर्तन केले, ते एक एक त्याला आठवू लागून त्याच्या हृदयाचा दाह होऊ लागला!

ती राक्षसी आणि ही प्रेम-देवता !

अतिशय सकोचाने, भीतभीत, श्रीकान्ताने सुनन्दाचा हात आपल्या हातीं घेतला, आणि सद्गदित होऊन, क्षमायाचनेच्या स्वराने त्याने हाक मारली,

" नन्द—नन्द—नन्द!"

सुनन्दानें सजल नयनांनीं पतीकडे पाहिले. नतर हळुहळू त्याच्या खांद्यावर मस्तक ठेवून ती गद्गद कंठाने म्हणाली,

" घरीं चलायचं ! "

— सम्पूर्ण —

# वाचनीय पुस्तकें

वेणू वेलणकर

लेखक

श्री. भा. वि. वरेरकर

किंमत रु. १॥

कु. गीता साने यांच्या कादंबऱ्या

| | |
|---|---|
| वठलेला वृक्ष | किं. रु. १॥ |
| निखळलेली हिरकणी | किं. रु. १ |
| हिरवळीखालीं | कि रु. १॥ |
| लतिका | किं. रु. १ |

प्रकाशक

महाराष्ट्र प्रकाशन संस्था

मुंबई, नं. ४